# राजस्थानाचा इतिहास.

## उदेपुर.

हा ग्रंथ

कर्नल् टॉड् यांच्या 'अनल्स् ऑफ् राजस्थान' या ग्रंथाच्या आधारें

**लोकहितवादी**

यांनीं लिहिला.




त्याची ही दुसरी आवृत्ति

मुंबईंत

जावजी दादाजी यांच्या

'निर्णयसागर' छापखान्याचे मालक तुकाराम जावजी

यांनीं छापून प्रसिद्ध केली.

१८९४

किंमत १५ रुपये.

महाराष्ट्र देशांतील लोकांमध्यें

ग्रंथसमृद्धिद्वारें ज्ञानवृद्धि व्हावी

या हेतूनें

देशबांधवांस

हा ग्रंथ

परमप्रीतिपुरःसर अर्पण केला आहे.

लोकहितवादी.

लोकहितवादी.



सरदार

राव बहादूर

**गोपाळराव हरि देशमुख**

जे. पी.

जन्म-स० १८२३. मृत्यु-स० १८९२.

# प्रस्तावना.

राजस्थानांतील क्षत्रिय राजांचा व राजघराण्यांचा इतिहास महाराष्ट्रभाषेंत नसल्यामुळें त्याची मराठी भाषेंत प्रसिद्धि करण्याची इच्छा होती. परंतु तसा क्षत्रिय राजांचा आणि राजकुलांचा इतिहास देण्यापूर्वी राजस्थानाची । त्यांतील रीतिरिवाज वगैरेंची माहिती देणें अवश्य होतें, त्याप्रमाणें ती आरंभीं थोडक्यांत दिली आहे.

या माहितीवरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल कीं, हिंदुस्थानांत क्षत्रियकुलोत्पन्न लोक अद्यापि आहेत. ब्राह्मणांनीं लिहून ठेविलें आहे कीं:—'आद्यंतस्थितिवर्णानां भविष्यंति कलौ युगे,' ह्मणजे, कलियुगांत ब्राह्मण व शूद्र हे दोन वर्ण मात्र अस्तित्वांत राहतील; अर्थात् क्षत्रिय व वैश्य ह्या जाती नष्ट होतील. पण हें भविष्य अविश्वसनीय आणि अप्रमाण होय. याला बहुत कारणें दाखवितां येतात व वरील दोन वर्ण नष्टप्राय झाल्याचें लिहिण्यांत कांहीं तरी पक्षपात असावा असें सिद्ध होतें. ब्राह्मणक्षत्रियांचीं आपसांत घोर रणें माजून त्यांत एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली हें ह्मणणें जसें अत्युक्तीचें आहे, त्याच प्रकारचें वरील नष्टवर्णतेचें ह्मणणें आहे. एक वेळ निःक्षत्रिय पृथ्वी झाल्यावर दुसऱ्यानें क्षत्रिय आले कोठून? हा विचार पौराणिकांनीं कसा केला नाहीं? व जसें एक, दोन, तीन, ह्याप्रमाणें एकवीस वेळां ब्राह्मणांनीं क्षत्रियांच्या वंशावर आणि वर्णावर शस्त्र धरूनही प्रत्येक वेळीं क्षत्रियांचें बीज अवशिष्ट रहातच गेलें, तसें एकवीस वेळांनंतरही क्षत्रियांचें अगदीं निर्मूलन झालें हें तरी कशावरून? त्याचप्रमाणें, येवढें क्षत्रियांशीं कट्टे वैर करणारा परशुराम, त्यानें ह्या एकवीस खेपा केल्या, तरी त्याचे पुढें राम, कृष्ण, कौरव, पांडव, वगैरे क्षत्रियकुलें व वीरोत्तंस लोक झाले कोठून? तेव्हां ही संगति जमत नाहीं. पृथ्वीराजापर्यंत या भरतखंडाचें राज्य क्षत्रियांकडे होतें. व त्यांत कितीएक राजे चक्रवर्ती होऊन जाऊन हल्लींही त्यांचे वंश मांडलिक रूपानें नांदत आहेत. हे वंश ह्मणजे आपल्या दक्षिणेकडे चव्हाण, भोंसले, शिरके, जाधव वगैरे शहाण्णव कुळींचे जे लोक आहेत ते होत. परंतु यांची वस्ती शूद्र लोकांत झाल्यामुळें त्यांचा व्यवहार वगैरे शूद्र लोकांप्रमाणेंच होऊं लागला व आपत्कालामुळें त्यांचे उपनयनादि संस्कार बंद पडले. त्याचप्रमाणें वैश्य जातीमध्येंही न्यूनत्व येऊन त्यांच्या पूर्वकर्मांत भेद झाला. ह्मणजे, त्यांचें यज्ञोपवीत जाऊन त्याचे जागीं कंठी आली; वगैरे फेरबदली झाल्या. परंतु हा सर्व घोटाळा आलीकडील असून, या उभय वर्णांचें अस्तित्व यापूर्वी कधींच नाहींसें झालें ह्मणून पौराणिकांनीं व्यर्थ ओरड केली आहे! तेव्हां असले लेख अविश्वसनीय आणि अप्रमाणभूत ... ण्यास हरकत नाहीं.

परंतु आतां याचेविषयीं वादविवाद करण्यांत हांसील ना... मानण्याची जी पूर्वरीति होती ती जाऊन जन्मानुरूप वर्ण राह... सून ब्राह्मणांच्या वरील ह्मणण्यास अंशतः पाठबळ मिळाल्या... कीच्या समजुतींनीं एखाद्या वस्तूचें अस्तित्व नष्टप्राय मा... थवा निखालस पक्षपात आहे असें सिद्ध होतें. वस्तुत...

हिंदुस्थानांत आर्य आणि अनार्य असा भेद जो बरेच दिवसांपासून चालत आला आहे, तोच आतां ठेवण्याचें कारण नाहीं. एकंदर ह्मटलेल्या आर्यांचा किंवा अनार्यांचा नफा-तोटा व लाभहानि हीं यापुढें सारखींच असल्यामुळें आर्य व अनार्य यांनीं उभयतांविषयीं सप्रेमबुद्धीनें आणि ऐक्यानें वागावें हें कालमन्वंतराप्रमाणें योग्य व अवश्य आहे. देशसंबंधानें आणि राष्ट्रसंबंधानें आर्य व अनार्य ह्मटलेले हिंदु, मुसलमान, यहुदी, पारशी किंवा इतर कोणत्याही जातीचे, धर्माचे व आचाराचे लोक असोत; परंतु ते प्रजाधर्मात सर्व एकच असून त्यांचें नफानुकसान सारखेंच असल्यामुळें त्यांनीं परस्परांचा हेवादावा न करितां व आपसांत वैरें न माजवितां ऐक्यतंत्रानें राहून स्वदेशहित साधावें हें अवश्य आहे.

क्षत्रियांच्या व रजपुतांच्या वीर्यपराक्रमाचे इतिहास वाचावयास फार मनोरम व अद्भुत असून त्यांच्या योगानें अंतःकरणांत एक प्रकारचा उत्साह उत्पन्न होतो. उत्तरेकडे सिसोदिया वंश जसा पराक्रमी व अभिमानी असून त्याचा इतिहास तिकडे पूज्य व अभिनंदनीय आहे, तसा त्याच कुळांत इकडे उत्पन्न झालेल्या शिवाजीचा इतिहास लोकांना प्रोत्साहक व अभिनंदनीय वाटतो. सिसोदियावंशरूप सहस्ररश्मी प्रभाकराचें कोठें एक किरण दक्षिणेकडे आलें व त्यांत वरील शिवरत्न उत्पन्न होऊन त्यानें आपलें तेज प्रकट केलें; परंतु राजस्थानांत त्या सिसोदियाप्रभाकरासारखे शेंकडों प्रभाकर होऊन जाऊन त्यांच्या किरणांत प्रकाशमान झालेलीं सहस्रावधि रत्नें जेथें आपल्या तेजानें लोकांचे नेत्र दिपवून नाहींशीं झालीं, त्यांचे इतिहास किती आल्हादकारक व्हावे याचें अनुमान करणें फारसें कठीण नाहीं. इकडे एकच शिवाजी किंवा एकच बाजीराव देशाभिमानी व वीरशिरोमणि होऊन गेला; परंतु राजस्थानांत असे शेंकडों शिवाजी आणि शेंकडों बाजीराव होऊन गेले, असें आह्मीं पुढें लिहिलेल्या इतिहासांत वाचकांस आढळून येईल. इतिहास लिहिण्यापूर्वी, ज्यांचा इतिहास ल्याहावयाचा त्यांचें पूर्वरूप व स्थिति काय होती किंवा आहे हें सांगितलें ह्मणजे तितका जास्त खुलासा होतो, असा विचार करून, पुढील इतिहासाला साधक असा राजस्थानाचा तांत्रिक व साधारण इतिहास आरंभीं दिला आहे. त्यापुढें मोठमोठ्या वीर पराक्रमी राजपुरुषांचीं चरित्रें येऊन आह्मीं वर ह्मटलेल्या प्रोत्साहक व आल्हादक गोष्टी वाचकांस यथेच्छ कळतील.

रजपुतांच्या इतिहासांत अनेक वीर होऊन गेलेले व त्यांचें वीर्य, पराक्रम, शौर्य, अभिमान, एकनिश्चयिता, साहस, धाष्टर्य वगैरे अनेक प्रसंगीं व्यक्त झालेले त्यांच्या पुढील इतिहासावरून वाचकांस कळून येईल. शाळाखात्यांतील क्रमिक पुस्तकांपैकीं पांचव्या पुस्तकांत [illegible] लोकांच्या कित्येक निवडक गोष्टी दिल्या आहेत त्यांचें मनोरमत्व जितकें [illegible] रजपुतांच्या इतिहासांत ठिकठिकाणीं आणि विपुल भरलें आहे. असले [illegible] या महाराष्ट्रभाषेंत मुळींच अश्रुत आहेत. ह्मणून तसे इतिहास [illegible] ची यत्किंचित् सेवा करावी या इच्छेनें हा इतिहासलेखनाचा क्रम [illegible] कडून स्वीकार होऊन तो त्यांस रुचला ह्मणजे कर्त्याच्या श्र-

# राजस्थानाचा इतिहास.



## भाग पहिला.

## देशाची माहिती.

सीमा, प्रदेशवर्णन वगैरे.—माहितीचीं साधनें.—प्राचीन क्षत्रियकुलांची माहिती.—ब्रह्मक्षत्रियांचा अभेद.—दिल्ली शहर.—क्षात्रवंशांची पूर्वपीठिका.—क्षत्रियांच्या नगरांचें आणि शहरांचें वर्णन.—राजपुतान्यांतील सूर्यसोमवंशज.—युधिष्ठिरापासून इंद्रप्रस्थचे राजे.

रजपुतस्थानास राजपुताना, राजस्थान किंवा रजवाडा असें ह्मणतात. रजपुतस्थानाच्या चतुःसीमा येणेंप्रमाणें आहेतः—उत्तरेस हिंदुस्थान व यमुना नदी; पूर्वेस हिंदुस्थान व माळवा; दक्षिणेस गुजराथ; व पश्चिमेस सिंध व कच्छ. यांत मुख्य शहरें उदेपूर, जोधपूर, किसनगड, जयपूर, नागोर, किरोली, चंदेर, साळुंबर, भरतपूर, अलवर, सिरोही, अजमीर, पाली, जसलमीर, बिकानीर, बुंदी, कोटा, वगैरे आहेत. रजपुतस्थानांत मारवाड, मेवाड, मेरवाडा, हे प्रदेशही मोडतात. यांत आरवली, अबू, चितोडगड, मढार, नीलकंठ, वगैरे पर्वत असून बनास, चमेल (चंबळा), बेरी, खारी, वगैरे नद्या आहेत. यांत भील, मेणा, मेर वगैरे प्राचीन लोक राहत असून त्यांचीं हत्यारें तीर, कमान, व तरवारी हीं आहेत. रजपुतस्थानांतल्या डोंगरांत सर्व प्रकारच्या धातु, व मोलवान् पाषाण आणि रत्नें यांच्या खाणी सांपडतात. परंतु त्या धातु, ते पाषाण आणि तीं काढण्याचे कारखाने चालविणाऱ्या लोकांच्या ज्या पृथक् जाती होत्या, त्या नाहींशा झाल्या. त्यांतही, मुसलमानांस ह्या खाणी ठाऊक होऊं नयेत ह्मणून कित्येक खाणी बुजवून टाकिल्या; तरी, सुर्मा, तांबें, कथील, रुपें, अभ्रक, पाच, स्फटिक, संगमरवर, लोखंड, घरें बांधण्यास व चिरेबंदी करण्यास उपयोगी पडणारे पातीदार दगड, हे पूर्वी तेथें फार काढीत असत. रजपुतस्थानांत डोंगरावरील तळवट जमिनी पुष्कळ असून, मोठमोठीं मैदानें, रानें व रणें हीं पुष्कळ आहेत. त्यांत मृगजळें दिसतात. कधीं कधीं मोठमोठीं बावटळें सुटून मैदानांतील धुराळा आकाशांत उडतो व त्यामुळें अंधाऱ्या येतात. त्या सपाट्यांत मोठमोठे रेतीचे पर्वत होतात व ते इकडचे तिकडे व तिकडचे इकडे याप्रमाणें उडून जातात.

या प्रांतांत प्रथम इसवी सन १८०१ मध्यें इंग्रज लोक आले. तेव्हांपासून त्या

प्रांताची मोजणी करून नकाशे काढण्यास सुरुवात झाली. त्यांत निरनिराळे मार्ग, वाटा, नद्यांचे उतार, मुक्काम, जावते, व इतिहास हीं काढण्याकरितां बहुत प्रयत्न करावे लागले. या कामास साहेब लोक व त्यांचे हातांखालीं एतद्देशीय कामदार नेमून पूर्वींचे लेख, पुराणें, व माहितगार लोक यांचा तपास करावा लागला. तेव्हां सर्व प्रकारची माहिती मिळून त्यांना आपली सत्ता स्थापन करण्यास सुलभ झालें.

रजपुतस्थानाचा इतिहास पाहिला तर, क्षत्रियांच्या उत्पत्तीपासून नंदराजापर्यंत वेद व पुराणें यांजवरून माहिती मिळते. त्यांत असें दिसतें कीं, विवस्वान् राजाचा पुत्र वैवस्वत मनु याचे कारकीर्दीत जलप्रलय झाला. परंतु त्या प्रलयांत राजा व त्याचे कितीएक आश्रित असे एका नौकेमध्यें बसले व त्या नौकेचें भगवंतांनीं मत्स्यरूप धारण करून रक्षण केलें अशी कथा आहे. वैवस्वत राजाचें राज्य मेरु, ह्मणजे हल्लीं ज्यास कॉकेशस् पर्वत ह्मणतात, त्याचे जवळ होतें. बुधवंशीय राजेही याच मध्यभूप्रदेशांत (उत्तरकुरुदेशांत) झाले व पूर्वी याच भागाकडे काय ती वस्ती होती. वैवस्वताचा पणतू ककुत्स्थ यानें भरतखंडांत अयोध्याप्रांत किंवा कोसलदेश वसविला.

पूर्वीचे राजे ब्राह्मण व क्षत्रिय यांचीं कर्मे करीत व अशा राजांस 'राजर्षि' ह्मणत. या राजर्षींमध्यें अश्वमेध नामक यज्ञ करण्याची महत्वाकांक्षा फार असून असे समारंभ त्यांजमध्यें वारंवार होत. अश्वमेध करणें ह्मणजे सत्ता आणि संपत्ति यांच्या परमावधीचें दर्शक होय असें ते समजत असत. हाच संप्रदाय त्यांनीं अयोध्येंत आल्यावरही ठेविला होता; व तो पांडवांच्या अखेरीपर्यंत चालला होता. राजर्षि हे आपला राज्यकारभार करून तपस्याचरण करीत. ते जटाजूट राखून ऋषींचीं सर्व कर्मे आचरीत. ते आपल्या कन्या ऋषींना देत. पांचालदेशच्या राजाची कन्या

---

१. विवस्वान् हें सूर्याचें नांव आहे व त्यावरून त्याचे वंशास 'सूर्यवंश' ह्मणण्याची रूढी पडली. परंतु हें केवळ कवींचें लाघव होय.

२. ही गोष्ट 'शतपथब्राह्मण' व 'श्रीमद्भागवत' यांजमध्यें प्रसिद्ध आहे.

३. 'ऐतरेयब्राह्मणा'चें २३ खंड ८ पंचिका यांजमध्यें अश्वमेधाची मोठी तारीफ केली असून; दौष्यंति जो भरत त्यानें यमुनेच्या कांठीं ७८ व भागीरथीचे कांठीं ५५ असे १३३ अश्वमेध यज्ञ केले; इतके यज्ञ पूर्वी कधीं कोणीं केले नाहींत आणि पुढें कोणी करणार नाहीं वगैरे मोठी प्रशंसा लिहिली आहे:—

'अष्टासप्ततिं भरतो दौष्यंतिर्यमुनामनु । गंगायां वृत्रघ्ने बन्धात्पंचपंचाशतं हयान् ॥
त्रयस्त्रिंशच्छतं राजाश्वान्बध्वाय मेध्यान् । * * * महाकर्म भरतस्य न पूर्वे नापरे जनाः ॥'
इत्यादि.

४. असले राजर्षि विश्वामित्र, जनक, ऋतुपर्ण व प्रियव्रत वगैरे 'भारतां'त प्रसिद्ध आहेत.

अहल्या व यदुकुलीन राजकन्या रेणुका ह्या अनुक्रमें गौतम व जमदग्नि या ऋषींस दिल्या होत्या. ह्याप्रमाणें ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन्ही वर्ण अभेदबुद्धीनें राहत होते.

पुढें ते उभय वर्ण निरनिराळे झाल्यावर त्यांजमध्यें कधीं कधीं तंटे पडत. गाधिपूर किंवा कनोज येथील कौशिकवंशीय गाधिराजाचा पुत्र विश्वामित्र यानें वसिष्ठाशीं वाद केल्याची गोष्ट 'रामायणां'त प्रसिद्ध आहे. या वादाचे वेळेस अयोध्येस अंबरीष राजा राज्य करीत असे. पूर्वीच्या ब्रह्मक्षत्रियांच्या उत्पत्तीचा आणि विवाहविधीचा कांहीं एक नियम नसे असें अनेक उदाहरणांवरून दिसतें. श्रीमद्व्यास यांचें जन्म योजनगंधा नामक निषादकन्येपासून (कोळ्याच्या मुलीपासून) झालें; विचित्रवीर्य राजाचे राणीला व्यासापासून नियोगमार्गानें पंडु व धृतराष्ट्र हे क्षेत्रज पुत्र झाले व ते इंद्रप्रस्थ येथें राज्य करीत; वाल्मीक हा पूर्वी भील होता; आणि तसाच कवष हा शूद्र होता; परंतु ते स्वकर्मानें पुढें मोठाले ब्रह्मवेत्ते असे ऋषि झाले. या सर्व उदाहरणांवरून पूर्वी हल्लींसारखा जातिभेद व वर्णभेद नसे हें सिद्ध आहे.

पांडवांचा वंश बुडाल्यावर इंद्रप्रस्थाचा सार्वभौम अधिकार कांहीं काळपर्यंत तुवरवंशीय विक्रमादित्य राजास मिळाला होता. त्यानंतर अनंगपाल राजा झाला; त्यानें इंद्रप्रस्थाजवळ दिल्ली शहर बांधिलें. तेथील अधिकार त्याचा नातू (दौहित्र—मुलीचा मुलगा) पृथ्वीराज ऊर्फ राय पिठोरा यास प्राप्त झाला. त्यांचा अंत झाल्यापासून दिल्लीस मुसलमानी बादशाही झाली. त्यानंतर तेथें मराठे लोकांचा झेंडा लागला; व नंतर इंग्रजांचा अम्मल झाला. इंग्रजांच्या अमदानीपर्यंत जे जे राजवंश झाले त्यांनीं त्यांनीं आपापल्या डौलाकरितां आणि मिजासीसाठीं आपापल्या राजधान्यांतून मोठमोठ्या इमारती, जयस्तंभ, लोहस्तंभ, किल्ले, मशीदी, दगडी बारे, नहर वगैरे बांधून ठेविले; त्यांजवरून व त्यांचे संबंधानें जे शिलालेख, ताम्रपट आणि त्यांचीं नाणीं आज उपलब्ध आहेत त्यांजवरून त्यांच्या संपत्तीचें व ऐश्वर्याचें दर्शन होऊन त्यांची आठवण होते. परंतु, याजपेक्षांही चिरकालस्मरणीय अशीं, इंग्रज सरकाराकडून होत असलेली ज्ञानवृद्धि, स्वस्थता, व्यापारोत्तेजन, कायदे, कालवे, पूल, तळीं, रस्ते, आगगाड्यांच्या सडका, तारायंत्रें, इत्यादि कृत्यें होत आहेत, असें हल्लींचे लोक ह्मणतात तें कांहीं मिथ्या नाहीं.

सोमराजाच्या वंशांतील सहावा पुरुष पुरु यानें प्रयाग येथें आपली राजधानी केली. या राजधानींत पुरूचे पश्चात् ५० पुरुषांनीं राज्य केलें. तसेंच अयोध्येंतही रामचंद्रापर्यंत ५८ पुरुषांनीं राज्य केलें. या राजावलीच्या संबंधानें प्रत्येक पुराणांत कांहीं तरी फरक असतो. त्यास मेळ घालणें मुष्कील आहे. यदुवंशीय स-

१. राजावलि १ पहा.

हस्तार्जुन हा नर्मदातीरीं माहिष्मती नगरींत राज्य करीत असतां त्याचें जामदग्न्य (परशुराम) याशीं युद्ध झालें; व त्यांत तो मारला गेला. तेव्हांपासून क्षत्रिय वंशाचा नाश झाला. ब्राह्मण व क्षत्रिय यांजमध्यें जी मोठी अदावत वाढली होती तिचा हा अखेर परिणाम झाला. तरी सूर्यवंशीय आणि सोमवंशीय राजे परस्परांशीं लढत होते. अयोध्येचा सगर राजा व तालजंघ या सूर्यसोमवंशीयांचें तुमुल युद्ध झालें. सोमवंशीय श्रीकृष्ण आणि कंस, त्याचप्रमाणें भीम आणि जरासंध, यांचीं युद्धें तर सुप्रसिद्ध असून, अशीं आपसांतलीं युद्धें बहुत झाल्याचे इतिहासांत दाखले आहेत.

अयोध्या हें शहर शरयू नदीच्या तीरीं वसविलेलें[१] असून तें रामचंद्रापूर्वींपासून फार मोठें होतें. तें कोसल देशाची मुख्य राजधानी असून त्याचा विस्तार इतका मोठा होता कीं, त्या शहराचें स्मशान काशी शहर होतें! पुढें अयोध्या हें शहर मोडून त्याचीं लखनौ व फैजाबाद हीं शहरें झालीं. इक्ष्वाकु राजाचा नातू मिथिल यानें मिथिलदेशीं जनकपूर नामक शहर राजधानी केलें. याच वंशांत जनकराजा झाला. कृष्णानें आनर्त देशांत कुशस्थली द्वारका शहर वसविलें. शिवाय

---

१. अयोध्या नगरीचें वर्णन 'वाल्मीकिरामायणां'त पुढीलप्रमाणें केलें असून तें हुबेहूब हल्लींच्या मुंबई शहराप्रमाणें आहे व यावरून पूर्वींही हल्लींप्रमाणेच व्यवस्थित नगररचना असाव्या असें दिसतें:—

'कोसलो नाम मुदितः स्फीतो जनपदो महान् । निविष्टः शरयूतीरे पशुधान्यधनाढ्यमान् ॥
अयोध्या नाम तत्रासीन्नगरी लोकविश्रुता । मनुना मानवेंद्रेण पुरैव परिनिर्मिता ॥
आयता दश च द्वे च योजनानि महापुरी । श्रीमती त्रीणि विस्तीर्णा नवसंस्थानशोभिता ॥
सुविभक्तांतरद्वारा सुविस्तीर्णमहापथा । शोभना राजमार्गेण जलसंशांतरेणुना ॥
नानावणिग्जनोपेता नानारत्नविभूषिता । महाशालावृता दुर्गा उद्यानवनशोभिता ॥
दुर्गगंभीरपरिखा नानायुधसमन्विता । कवाटतोरणयुता उपेता धन्विभिः सदा ॥
राजा दशरथो नाम महात्मा राष्ट्रवर्धनः । तां पुरीं पालयामास स्वपुरीं मघवानिव ॥
दृढद्वारप्रतोलीकां सुविभक्तांतरापणाम् । नानायंत्रायुधवतीं नानाशिल्पगुणान्विताम् ॥
शतघ्नीपरिघोपेतामुच्छ्रितध्वजतोरणाम् । हस्त्यश्वरथसंपूर्णां नानायानसमाकुलाम् ॥
नानापथिकदूतैश्च वणिग्भिश्चोपशोभिताम् । देवतायतनैश्चैव विमानैरिव शोभिताम् ॥
सभोद्यानप्रपाभिश्च रुचिराभिरलंकृताम् । प्रविभक्तमहाहर्म्यनरनारीगणान्विताम् ॥
विद्वद्भिरार्यपुरुषैराकीर्णाममरोपमैः । आरोहमिव रत्नानां प्रतिष्ठानमिव श्रियः ॥
महाप्रासादशिखरैः शैलाग्रैरिव भूषिताम् । विमानशतसंबाधामिंद्रस्येवामरावतीम् ॥
अष्टापदपदालेख्यै रम्यामालिखितामिव । नानारत्नचयैश्चित्रां धनधान्यसमन्विताम् ॥
अविच्छिन्नांतरगृहां समभूमिनिवेशिताम् । मृदंगवेणुवीणानां रम्यैः शब्दैर्विनादिताम् ॥'
इत्यादि.

ब्रिज (ब्रज) देशांत कंसाची मथुरा ही राजधानी होती. दुष्यंत व भरत यांची प्रयाग ही राजधानी होती. हस्तिराजानें गंगातीरीं हस्तिनापूर वसविलें. कंपिल राजानें पांचाल देशांत कंपिलनगर वसविलें. अजमीढवंशीय राजांनीं महोदयपुरी ह्मणून नगर वसविलें. पुढें याचेंच नांव कान्यकुब्ज किंवा कनोज असें पडलें. महोदयपुरीलाच गाधिपूर असें ह्मणत, कारण तेथें गाधि नांवाचा विश्वामित्राचा पूर्वज राजा राहात होता. कनोज शहराची प्रशंसा, प्रसिद्ध कवि चंद भाट आणि प्रसिद्ध इतिहासलेखक फेरिस्ता व अबुल फजल यांनीं फार वर्णिली आहे. ते ह्मणतात कीं, हें गाधिपूर शहर इतकें मोठें व विस्तृत होतें कीं, तेथें तीस हजार तांबोळ्यांचीं दुकानें होतीं. पुढें इ० स० १२०० मध्यें जयचंद राठोड याचे कारकीर्दीत तें शहर उद्वस्त होऊन त्याचें सर्व वैभव नाहींसें झालें. कनोजाजवळच कौशांबीपूर ह्मणून एक मोठें शहर कुशांब राजानें वसविलें होतें. पुढें कुशांबाचे मुलांनीं धर्मारण्य व वसुमती हीं दोन शहरें वसविलीं. जरासंधाची राजधानी मगध देशांत (बहार प्रांतांत) राजगृही ह्मणून होती. कुरुवंशाची राजधानी गंगातीरचें हस्तिनापूर हेंच शहर होतें. युधिष्ठिराची राजधानी यमुनातीरीं इंद्रप्रस्थ ह्मणून नगरी होती. या इंद्रप्रस्थासच इ० स० ८०० मध्यें दिल्ली असें नांव दिलें. बाल्हीकवंशीय राजांनीं पाटलीपुत्र ह्मणून गंगातीरीं आपली नगरी केली. कुरुवंशीयांनीं बुंदेलखंडांत कालिंजर ह्मणून एक किल्ला बांधिला. केरल, पांड्य आणि चोल हीं नांवें तेथील तेथील राजांचे नांवावरून पडलीं होतीं. हे देश मलबार किनाऱ्यावर समुद्रतीरीं, जेथें हल्लीं तंजावर वगैरे शहरें आहेत तिकडे, होते. अंगराजानें जो प्रदेश जिंकिला त्याला अंगदेश असें नांव दिलें. येणेंप्रमाणें पूर्वीच्या क्षत्रिय राजांनीं जीं शहरें व संस्थानें वसविलीं त्यांचें थोडक्यांत निदर्शन केलें. हे सर्व महापराक्रमी क्षत्रिय राजे असून त्यांचें पुढें, भारती युद्धासारखीं मोठमोठीं युद्धें व रणें माजून त्यांत निर्मूलन झालें. व त्यांतही शेवटीं शेवटीं मुसलमानांशीं ज्या लढाया झाल्या त्यांत त्यांचा अगदीं नायनाट झाला!

जयपूर, उदेपूर, व जोधपूर येथील राजे आपल्यास सूर्यवंशीय ह्मणवितात आणि जसलमीर व कच्छ या प्रांतीं भाटी व जाडेज नांवाचे रजपूत आहेत ते आपल्यास सोमवंशीय ह्मणवितात. जयपूरचे कच्छवाह नांवाचे जे रजपूत आहेत तें नांव कुशवाह नांवाच्या क्षत्रियांचें अपभ्रष्ट नांव होय असें ह्मणतात.

युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ केला त्यांत त्यानें सर्व राजे निमंत्रित करून त्यांस यज्ञमंडपांत अंकितांप्रमाणें कामें सांगितलीं हें परमावधीचें ऐश्वर्यसुख भोगिलें. पुढें कालगति फिरली तसा त्यानें आपल्या भ्रात्यांसहवर्तमान वनवासही भोगिला. नंतर

पुनः अनुकूल काल बघून त्यानें कौरवांचा नाश करून त्यांजपासून आपलें इंद्रप्रस्थचें राज्य पुनः मिळविलें व आपला शक चालू केला. पुढें पांडव व राम कृष्ण वगैरे सर्व हिमालयांत जाऊन तेथें मृत्यु पावल्यानंतर पांडवांचे मागें हस्तिनापुरास विक्रमादित्यापर्यंत निरनिराळ्या चार वंशांनीं मिळून ६६ राजांनीं राज्य केलें. यांतील राजपाल यानें कमऊंवर स्वारी केली. परंतु त्यांत सुखवंत म्हणून जो कमऊंचा अधिकारी होता त्यानें त्यास ठार मारिलें, व विजयी होऊन उलट तोच इंद्रप्रस्थावर येऊन त्यानें तेथील राज्य काबीज करून घेतलें. परंतु पुढें लौकरच विक्रमादित्यानें उज्जनीहून येऊन त्याजपासून पुनः इंद्रप्रस्थचें राज्य हिरावून घेतलें. तरी विक्रमादित्यानें इंद्रप्रस्थ येथील राजधानी मोडून अवंतीस(उज्जनीस)च आपलें सिंहासन नेलें. तेथें ८०० वर्षेपर्यंत अव्याहत राज्य चाललें होतें. विक्रमादित्यानें उज्जनी ही राजधानी केल्यापासून ज्योतिःशास्त्रवेत्ते उज्जनी हीच ग्रहांचे वेध घेण्यास पृथ्वीचा मध्यबिंदु कल्पूं लागले. तो अद्यापि हिंदुज्योतिषांत तसाच चालू आहे. विक्रमादित्यानंतर अनंगपालानें दिल्ली शहर वसविलें. या वंशांतील शेवटचा वंशज पुरुष पृथ्वीराज चव्हाण झाला. त्यास मुसलमानांनीं मारिलें आणि क्षत्रियवंशाचा शेवट झाला. युधिष्ठिरापासून पृथ्वीराज चव्हाणापर्यंत १०० राजे झाले व चव्हाणवंशानंतर रावड नांवाचा वंश अधिकारी झाला.

---

# भाग दुसरा.

## हिंदु लोकांची प्राचीन व अर्वाचीन स्थिति.

हिंदु लोकांची प्राचीन व अर्वाचीन स्थिति.—रजपुतांच्या चाली रीति वगैरे.—दक्षिणेकडील विजयादशमीचा बलि.

आर्य लोकांचे पराक्रमाची व बुद्धीची पूर्वकाळीं मोठी ख्याति होती. परंतु पुढें संपत्तीच्या अतिशय वृद्धीनें किंवा अज्ञानपणाच्या प्रसारानें त्यांस अत्यंत बुद्धिमांद्य येऊन त्यांचें सत्यदर्शन, उद्योगप्रीति, आणि ज्ञानवृद्धि यांजकडे दिवसांदिवस अतिशय दुर्लक्ष्य होऊं लागलें. त्यांची पूर्वरुचि सर्व पालटून अतिशयोक्तीचे प्रलाप, असंबद्ध व कल्पित वर्णनें व खोट्या माहित्या—इतिहास व भूगोल—इत्यादींवरच ते खुष होऊन तेवढ्यांतच आपली कृतार्थता मानूं लागले. तसेंच, या सर्व विरुद्ध गोष्टींनीं परिपूर्ण अशीं पुराणें व माहात्म्यें होऊन त्यांची बुद्धि खऱ्या मार्गापासून अगदीं भ्रष्ट झाली. ग्रंथांतून असत्य गोष्टी जसजसे लोक लिहीत गेले, तसतसें त्यांचें मंडनच होत जाऊन त्या लेखकांस दोष देणारा कोणीच राहिला नाहीं असें झालें. जें जें लिहिलें जाईल तें तें मान्य व प्रशंसनीयच, असें सर्वत्र होऊन गेलें. ह्या सर्व गोष्टी

फारच विलक्षण व अयोग्य झाल्या. आतां याचें कारण पाहिलें असतां असें होणेंही कांहीं असंभवनीय नव्हतें. त्या वेळीं सर्व देशांत अज्ञान लोकांचाच भरणा विशेष असून विद्या थोड्यांच्याच हातीं राहिली, यामुळें विद्वान् ह्मणविणारांस आपमतलब आणि स्वार्थ साधण्यास फारच अनुकूळ झालें. आणि स्वार्थपरायणतेमुळें वस्तुतः हिंदुस्थानाची खरी विद्या व खरें वैभव हीं विलयास जाऊन सर्वत्र असत्याचा बाजार थाटला गेला. वर लिहिल्या प्रकारचे ग्रंथ केल्यामुळें त्या काळीं त्यांची लोकांकडून बहुत स्तुति झाली असेल'हें खरें, परंतु त्याचा परिणाम फार वाईट झाला. आतां हा प्रकार केवळ हिंदुस्थानांतच झाला असें नाहीं. अन्य देशांतही अशा विरुद्ध गोष्टी बहुत होऊन त्या देशांचें पूर्ववैभव सर्व विलयास जाऊन ते नष्टचर्याचे तावडींत सांपडले ! सारांश अविचार, असत्य, अज्ञान आणि अदूरदृष्टि यांचें जेथें प्राबल्य झालें तेथें त्या देशांस अवकळा आली यांत आश्चर्य तें कसलें ? आसमंताद्भागचे जे तुच्छ, अप्रसिद्ध आणि अज्ञानाचें माहेरघर असे देश होते ते पुढें सरसावून तींच बलिष्ठ राष्ट्रें झालीं. नूतन विद्याकलांचे शोध, नवे कायदे, नव्या रीतिभाती आणि नवीन धर्मसुधारणा करून त्या अज्ञान देशांतील लोक तेजोवान् होत्साते जगापुढें नक्षत्रासारखे चमकूं लागून त्यांनीं आपापले देश उन्नतीच्या शिखरास पोंचविण्याची प्रबल महत्वाकांक्षा धारण केली, व ईश्वरकृपेनें त्यांच्या त्या महत्वाकांक्षेस यशही मिळालें. परंतु आमच्या आर्यावर्तांतील लोक जे पूर्वीं सर्व जगावर गाजले होते ते अगदींच निद्रावश झाले. जणूं काय बहुत काल त्यांनीं आपल्या देशाचा नांवलौकिक जगावर प्रसृत करण्याचे अश्रांत श्रम केल्यामुळें, त्यांनीं विश्रांतिच घेतली ! या निद्रेंत त्यांचें सर्व ऐश्वर्य, त्यांचें सर्व तेज, त्यांचें सर्व कर्तव्य आणि त्यांच्या सर्व महत्वाकांक्षा ह्याही झोंपल्या गेल्या ! अशा काळीं पश्चिमेकडून शिकंदर वगैरे यवन, म्लेंच्छ, पारसीक इत्यादि राजांनीं गर्दी करून या देशांतील संपत्तीचा धुव्वा उडविण्यास प्रारंभ केला. देशांत तर सर्वत्र आपसांतील भांडणें, कज्जे, अदावती आणि द्वेष माजून लोक निर्बळ व अशक्त झाले होते. सर्वांचा आवेश, सभ्यपणा, आणि जिज्ञासा हीं नाहींशीं होऊन सर्व लोकांस ग्लानि आली होती ! व यामुळें ते परकीय लोकांच्या भक्ष्यस्थानीं सहज पडले. लोकांच्या पहिल्या चालीरीति, इच्छा, व व्यवसाय वगैरे सर्व जाऊन नवीन आपत्तीच्या व अपकीर्तीच्या खोल खड्ड्यांत पाडणाऱ्या चालीरीति, इच्छा व नाना ढंग यांजमध्यें ते प्रविष्ट झाले. राज्यव्यवस्था, शोध आणि विद्यावृद्धि यांजविषयींची काळजी यांचा त्यांनीं जणूं काय उत्सर्ग करून नाच, तमाशे, भोजनें, नाटकें आणि वेश्याछंद यांचे रंगांतच सर्व ऐपतदार व तदनुषंगिक लोक दरोबस्त दंग होऊन गेले. तशांत त्यांच्या कृत्यांची नांवाजणी

करणारे अनुद्योगी व परोपजीवी असे आर्जवी व धर्माधिकारी लोक यांनीं तर त्यांस त्यांच्या छंदांत व फंदांत अधिकाधिकच गाडून टाकिलें ! आणि अशा या अज्ञानप्रसारानें एतद्देशीयांमध्यें अनेक निंद्य व तिरस्कार्य चालीरीतींचें मनस्वी प्राबल्य माजलें.

धर्माचें वेड तर विलक्षणच माजून त्याखालीं अनेक अनन्वित कृत्यें बेलाशक गोंवून त्याला हे धर्मवेडे लोक बेधडक अनुसरून त्यांतच आपली, आपल्या कुलाची आणि आपल्या देशाची धन्यता मानूं लागले. सती[1] जाणें, करवत घेणें, गळ टोंचणें, कड्यावरून उड्या टाकणें, मुमूर्षू प्राण्यांस गंगेच्या पाण्यांत डुबक्या देणें, जलसमाधि घेणें, कन्याहत्या करणें, नरमेध आचरणें, स्त्रियांस शूद्रवत् मानणें व त्यांचे हाल हाल करणें ह्या सर्व गोष्टी वरील धर्मवेडानें अतिशय बोकाळून त्यांना ग्रांथिक आधार ह्मणून नवीं नवीं वचनेंही ठिकठिकाणीं सामील करून देण्यांत आलीं. कित्येकांनीं हे आधार श्रुतिस्मृतिपुराणांतून काढण्याचे श्रम करून तीं सर्व बंडें पक्कीं करण्याचें श्रेय घेतलें. सारांश, खरा पुरुषार्थ, खरें कर्तव्य, खरा धर्म आणि खरें तप हीं जाणण्याविषयीं येथून तेथवर सर्वत्र अज्ञानपणाचें अभ्र पसरलें व सर्वांस भुरळ पडून दिशाभूल झाली !

लोकांची विचारशक्ति आणि सत्यदर्शन हीं इतकीं मंद पडलीं कीं, त्यांस ग्राह्याग्राह्य आणि त्याज्यात्याज्य ह्मणून कांहींच समजेनासें झालें. आधार ह्मणून कोणीं कांहीं दाखविलें कीं, त्यास हे धर्मपिसे लोक डोळे झांकून अनुसरलेच, असा प्रकार सर्वत्र असलेला दृष्टीस पडतो. आत्महत्या करणें हें सर्व शास्त्रकर्त्यांस असंमत असून त्याबद्दल ब्रह्महत्या आणि आत्महत्या हीं दोन पातकें होतात अशीं वचनें असूनही सतीचा संप्रदाय चालू केला ! व त्याजबद्दलचें असें समाधान लिहिलें कीं, 'ऋग्वेदवादात्साध्वी स्त्री न भवेदात्मघातिनी.' आतां हा वेदाधार अथवा ऋग्वेदवाद कोणता आहे व त्याचा अर्थ पाहिला तर सर्वांशानीं किती विरुद्ध आहे हें कोणाही समंजस मनुष्याच्या ध्यानांत येईल. परंतु आपमतलबापुढें सत्याचा कसकसा अपलाप होतो हें यावरून चांगलें लक्षांत येईल.

---

१. 'इमा नारीरविधवा: सपत्नीरांजनेन सर्पिषा संविशंतु ।
अनश्रवोऽनमीवा: सुरत्ना आरोहंतु जनयो योनिमग्रे ।।'

ऋग्वेद—अध्याय ७, अष्टक ७, वर्ग १०.

हें मूळचें वेदवाक्य व यांत मृताच्या स्त्रियांनीं स्वस्थ घरीं जावें असें सांगितलें असतां शेवटच्या 'योनिमग्रे' या पाठांत 'योनिमग्ने:' असा पाठभेद करून विधवांनीं घरीं जावयाचें तें अग्नींत प्रवेश करावयाचा असा अर्थ लढवून सतीची रूढी ठरविली. परंतु त्याबद्दल खरा शोध आणि सत्यार्थबोध करून घेण्याची कोणासच कधींही बुद्धि झाली नाहीं ! हें नवल नव्हे काय ?

सारांश, पुढें जें जें होत गेलें तें तें सर्व आमच्या देशास, लोकांस आणि आमच्या पहिल्या कीर्तीस व वैभवास अत्यंत अनिष्ट असेंच होत गेलें. याविषयीं जितकें लिहावें तितकें थोडेंच आहे. याप्रमाणें ह्या देशाची स्थिति मुसलमान लोक इकडे आले तेव्हां होती आणि या स्थितीमुळेंच त्यांचा ह्या देशांत प्रवेश झाला. नाहीं तर कोठून होता ? अस्तु.

कलियुग आणि युधिष्ठिराचा शक हीं बरोबरच सुरू झालीं. त्याप्रमाणें पाहिलें असतां कलियुगास आज ४९९३ वर्षें झालीं व इतकींच युधिष्ठिर शकाचींही असलीं पाहिजेत. युधिष्ठिरानंतर ३०४४ वर्षांनीं विक्रम संवत् सुरू झाला व विक्रमानंतर १३५ वर्षांनीं शालिवाहन शकास प्रारंभ झाला. त्याप्रमाणें पाहिलें असतां आज विक्रम संवत् १९४९ व शालिवाहन शक १८१४ हें साल सुरू आहे. या इतक्या कालाचा आपण इतिहास पाहूं लागलों तर या हिंदुस्थानांत किती राज्यक्रांति आणि तज्जन्य सर्व प्रकारचे फेरफार किती झाले असतील त्याचें अनुमान वाचकांनींच करावें. ह्या इतक्या कालांत या देशावर चीन, तुर्क, इराण वगैरे देशांतून तक्षक, जित, जाट, हूण, शक, नाग, काठी वगैरे नानाप्रकारचे दांडगे व बुभुक्षित लोक येऊन त्यांनीं ठिकठिकाणीं वस्ती केली. व त्यांचें कर्म इकडील क्षात्रधर्माप्रमाणेंच असल्यामुळें ते इकडल्या क्षत्रियांत समाविष्ट होऊन गेले. शाकलद्वीपी ब्राह्मण अद्यापि गयेस आहेत, ते परद्वीपस्थ होत. ह्या प्रकारचें मिश्रण आणि घालमेली पूर्वी पुष्कळ होऊन गेल्याचें, क्षत्रियांमध्यें जीं आडनांवें अद्यापि चालतात त्यांवरून, उघड दिसतें. तशींच क्षत्रियांचीं दैवतेंही बघितलीं तर त्यावरूनही या संबंधाची निःसंशयिता स्पष्ट होते. त्यांजमध्यें, उत्तरेकडे–शची, शाकंबरीमाता, आशा, वैखरीमाता, वगैरे असून दक्षिणेंत–गणपति, एकलिंग व जोडलिंग, मल्लारी, खंडोबा, ह्मसोबा, बहिरोबा, वेताळ, भैरव, अष्टसिद्ध इत्यादि अवैदिक देवदेवता या मिश्रीकरणानेंच प्रचारांत आल्या असाव्या असा तर्क आहे.

हल्लीं ज्या उपलब्ध क्षत्रिय ज्ञाति आहेत त्या व रजपूत लोक शिकार व पारध करून पशुपक्ष्यांचें मांस खातात. तसेच, ते सूर्य, अश्व आणि खड्ग (तरवार) यांचें पूजन करितात. क्षत्रियांचे व रजपुतांचे इतिहासज्ञ व इतिहासलेखक काय ते भाट असतात. ते त्यांचे इतिहास, वर्णनें व वंशावळी लिहून ठेवितात व प्रसंगविशेषीं गातात. भाट हे रणामध्यें क्षात्रधर्मास विशेष स्फुरण आणण्याकरितां, जीवितास

१. नर्मदेच्या उत्तरेस विक्रम संवत् चालतो व दक्षिणेकडे शालिवाहन शक चालतो हें प्रसिद्ध आहेच.

तृणवत् व युद्धसंग्रामीं पडणारास स्वर्गस्थ असें समजून पराक्रमी, शूर आणि विजयी अशांचा स्तुतिवाद नेहमीं गातात. रणांत युद्धप्रोत्साहक असा क्षत्रियांचा 'जय हर' 'जय हर' हा शब्द असून त्याची ते वारंवार गर्जना करितात. क्षत्रियांचें मुख्य व प्राचीन वाहन रथ आहे. क्षत्रियांना–अर्थात् रजपुतांना सुद्धां–आपल्या स्त्रियांचा अभिमान फार असतो. त्या शत्रूंच्या स्वाधीन झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं असा जेव्हां त्यांना प्रसंग दिसतो तेव्हां त्यांस ते मारून टाकितात. ते जुगार किंवा द्यूत वगैरे खेळ खेळतात. पांडवांचें जें कौरवांकडून राज्यहरण होऊन त्यांस वनवास भोगावा लागला, तो तरी जुगारीचाच परिणाम होय हें इतिहासप्रसिद्ध आहे. रजपूत हे स्वभावानें आळशी असून विद्वत्तेंत कमी असतात. ते ज्योतिष्, मुहूर्त व प्रश्न यांजवर विशेष विश्वास ठेवितात. त्यांजमध्यें मद्यपान बरेंच असून अफूच्या सेवनाविषयीं रजपुतांची तर ख्याति आहे; आणि या व्यसनांनीं तर ते फारच बुद्धिभ्रष्ट झाले आहेत. याचीं प्रत्यक्ष उदाहरणें पहावयाचीं असल्यास राजस्थानांतील दरोबस्त रजपूतराजे पाहून यावें. त्यांत कोणी सुस्त, कोणी कारभाऱ्यांचे हातींच सर्व भार देऊन चैनींत व विलासांत, आणि कोणी व्यसनाधीन झाल्यामुळें अत्यंत स्त्रैण व राण्यांच्या महालांत पिंजऱ्यांतल्या पोपटाप्रमाणें किंवा जनानखान्यांतल्या गुलामाप्रमाणें पडलेले असतात. या सर्व मनस्वी व अविचारीपणामुळेंच आलीकडे क्षात्रतेज अस्तंगत झालें आहे. रजपुतांमध्यें हल्लीं कुसुंब्याशिवाय दुसरा कसलाही आदर होत नाहीं! या लोकांत बलिदानाचा संप्रदाय फार असून त्यांच्या देवांस रुधिर आणि मद्य फार आवडतें असें दिसतें. त्यांजमध्यें मृतास जाळतात व त्याजबरोबरच त्याचीं ढाल, तरवार, तीर वगैरे जीं हत्यारें असतील तींही अर्पण करितात. त्यांच्या जाळलेल्या जागीं छत्री बांधितात. यांच्या स्त्रिया मृतपतींबरोबर सती जात असत. परंतु ती रूढी हल्लीं इंग्रजांनीं बंद केली आहे. या लोकांचे गुरु गोसावी, कानफाटे, जोगी वगैरे असून त्यांच्या उपदेशानें पारमार्थिक सुखाची प्राप्ति होते असें ते मानितात. त्यांजमध्यें कोणी शूर पुरुष मेला तर त्याचा जो घोडा असेल तो त्याच्या नांवानें दान करितात. त्यांजमध्यें मृताच्या छत्रीवर घोड्यांवर बसलेल्या वीरांचीं चित्रें काढण्याचा संप्रदाय आहे. त्यांना शपथ घेणें ती तरवार, कट्यार किंवा खांडा यांची घेतात. याचें कारण उघड आहे कीं, शपथ घेणें ती परमप्रिय आणि पूज्य वस्तूची घ्यावयाची. आणि रजपुतांमध्यें तर तरवार, कट्यार ह्याच प्रिय व पूज्य वस्तु

---

१. याचा अपभ्रंश 'जोहार' असा इकडे महार वगैरे लोकांत चालतो. उत्तेजक आणि आनंददर्शक असे शब्द देशपरत्वें निरनिराळे आढळतात. दक्षिणेकडे मराठ्यांचा रणप्रोत्साहक 'हर हर महादेव' असा शब्द आहे, व धनगर वगैरेंचा 'येळकोट मल्हार, चांगभले' असा आहे.

असल्यामुळें ते त्या वस्तूंचीच शपथ घेतात. क्षत्रिय व रजपूत लोक अंगांत चिलखत व डोक्यावर रंगीबेरंगी पागोटीं वापरतात. ते चंडीचें भजन व उत्सव करून वसंतपंचमी व बलिदानाचे दिवस हे सण ह्मणून पाळतात. त्यांजमध्यें कित्येक चाली अत्यंत क्रूरपणाच्या आणि निंद्य आहेत. त्याचप्रमाणें दक्षिणेंतही मराठे व कुणबी या लोकांमध्यें दुष्ट व तिरस्कार्य चाली आहेत. बलिदानाची रीति ही त्या चालींतील मुख्य ओंगळवाणी रीति आहे.

दक्षिणेकडे विजयादशमीचे दिवशीं शहराचे किंवा गांवाचे शिवेवर रेडा मारण्याची वहिवाट पुष्कळांस ठाऊक असेलच. गाइकवाड सरकारची स्वारी या दिवशीं मोठ्या समारंभानें निघून, त्या स्वारीचें पर्यवसान आणि कृतकृत्यता एका निरपराधी पुष्ट रेड्याचा हालहाल करून घात करण्यांत होते! परंतु यांत कोणत्याही प्रकारचा शूरपणा, वीर्य, पराक्रम अथवा मोठेपणा नाहीं. शिकारीच्या रीतीनें तरी तो रेडा जीव बचावण्याचा प्रयत्न करीत असतो आणि मागून त्याजवर शस्त्राचे वार होत असतात असेंही नाहीं. त्याचे पाय वगैरे बांधून नंतर त्याजवर घाय करावयाचे, हा विचाराच्या दृष्टीनें अत्यंत नामर्दपणा आहे. यांत इहपरत्र कोणतें पुण्य अथवा काय पुरुषार्थ आणि कोणता फायदा होत असेल तो त्यांचा त्यांस माहीत. परंतु ही केवळ अंधपरंपरेची गैरसमजूत चालत आलेली आहे. ह्या अज्ञानपणाच्या व अविचाराच्या कृत्यांस रोध करण्यास ब्राह्मण वगैरे सुशिक्षित लोक वजनदार व समर्थ असूनही त्यांजकडून आजपर्यंत तसें झालें नाहीं. तेव्हां, एकदां वेडेपणाचें पीक माजलें ह्मणजे तें विचारवंताचेंही कांहीं चालूं न देतां, उलट त्या वेडेपणांतच विंचारवंत प्रवेश करून त्यास उत्तेजन देतात असें दिसतें. ह्या रेड्यांच्या वगैरे बलिदानानें ज-

---

१. हें ह्मणण्यास ब्राह्मणकृत ग्रंथांतून कसकसे लेख लिहिले गेले आहेत ते बघितले ह्मणजे खात्री होईल. वरील बलि वगैरे करण्याविषयीं ग्रंथांत कसकसें लिहिलें आहे त्याचा थोडासा मासला पहा:—

'रक्तमांसैः सुराभिश्च बलिं दद्याद्विधानतः । माषान्नेन बलिं दद्याद्ब्राह्मणेन विजानतः ॥
धूजनोत्तरकाले च महिषस्य च हिंसनम् । खड्गेन कुर्यान्नृपतिर्देवीप्रीतिचिकीर्षया ॥
छागं वा मषकं वापि हिंसयेद्भक्तितत्परम् । पुरुषो वा प्रतिनिधौ कूष्मांडच्छेदनं विभौ ॥
देवीमुद्दिश्य कर्तव्यं तत्र दोषो न विद्यते । शक्तिरेव सदा सेव्या विद्वद्भिः कृतनिश्चयैः ॥
निश्चयैः सर्वशास्त्राणां ज्ञातव्या मुनिसत्तमाः । न श्रोतव्यं न मंतव्यमन्येषां वचनं बुधैः ॥
पूजनीया परा शक्तिर्निर्गुणा सगुणाथवा । राज्यभ्रंशे महोत्पाते जनमारीमहाभये ॥
सहस्रचंडिकापाठं कुर्याद्वा कारयेत्तथा । सुरामांसैस्तथा रक्तैः कल्याणैर्बलिमाचरेत् ॥
अन्नदानं विशिष्टं च कुर्याद्देवीप्रियं रतः । तस्मात्स्वकार्यसिद्धिस्तु नात्र कार्या विचारणा ॥

**स्कंदपुराण**—उत्तरसंहिता, हिंगुलाद्रिखंड.

रीमरी, ज्वर, ताप वगैरे सांसर्गिक रोगांचा उद्भव होत नाहीं अशी अडाणी लोकांची समजूत असते. आणि त्याच समजुतीला समंजस व विद्वान् असे ब्राह्मण वगैरे लोकही अनुसरतात हा चमत्कार आहे. यांत असें दिसतें कीं, ते आपलें वजन, त्यांच्या करण्यास अनुमोदन देऊन राखितात, इतकेंच. परंतु हें चांगलें नाहीं. यामुळें कधींही सुधारणेचा पाय ह्मणून देशांत शिरावयाचा नाहीं. राजेरजवाडे वगैरे थोर थोर व श्रीमान् लोकांचे जवळ हा सुशिक्षित व विद्वान् ब्राह्मणवर्ग पंडित, धर्माधिकारी वगैरे अधिकारावर आहे. परंतु हजारों वर्षांत त्यांनीं आपल्या यजमानांस योग्य सूचना करून देशसुधारणेचे व लोकसुखाचे उपाय सुचविले नाहींत, ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. व यावरून ते भीरु, कर्तव्यपराङ्मुख, आपमतलबी आणि देशाचे हितशत्रु होत अशीं निंद्य विशेषणें त्यांस सुधारलेल्या देशांतले लोक देतात. तींही सर्वथैव अयोग्य आहेत असें ह्मणवत नाहीं. देशसुधारणेसंबंधाचें यशापयश सुशिक्षित लोकांवरच विशेष असल्यामुळें व त्या प्रकारचें स्वकर्तव्य एतद्देशीय सुशिक्षितांनीं केलें नाहीं ह्मणून त्यांस दोष दिला तर त्यांतही काय वावगें झालें? ब्राह्मण वगैरेंच्या ह्या दुर्गुणांमुळें त्यांस मिळावी तशी प्रतिष्ठा व कीर्ति मिळत नाहीं, हें त्यांनीं यापुढें तरी समजलें पाहिजे.

---

# भाग तिसरा.

## रजपूत लोकांचे वंश.

रजपुतांचे वंश.—गेहलोटवंश व त्याचीं नामांतरें.—यदुवंश.—जाडेजा कुल.—तुवरवंश व त्याचा न्हास.—राठोडवंश व त्याची हकीकत.—कुशवाहवंश व त्याची हकीकत.—अग्निकुळांची माहिती.—प्रमारवंश.—प्रमारवंशाच्या पोटशाखा.—चव्हाणवंशाची माहिती.—मुसलमान होण्याची रीति.—सोळंखी वंशाची हकीकत.—सोळंखी वंशाच्या शाखा.—परिहारवंश.—चावडाकुळ.—टाक उर्फ तक्षककुळ.—जित किंवा जाट.—हूणलोक.—काठीलोक.—बालाकुळ.—झालाकुळ.—जेटवाकुळ.—गोहेलकुळ.—सिलारकुळ.—दाबीकुळ.—गोरकुळ.—डोडाकुळ.—गहेरवाळ किंवा बुंदेले लोक.—वीरगुजरकुळ.—सेंगारकुळ.—सिकरवाळकुळ.—बैसकुळ.—दाहियाकुळ.—जोहियाकुळ.—मोहिलकुळ.—निकुंपाकुळ.—राजपालीकुळ व दाहिरियाकुळ.—दाहिमाकुळ.—राजस्थानांतील मूळचे लोक, शेतकरी वगैरे.—वाण्यांच्या जाती.

रजपूत लोकांचे मुख्य वंश ह्मणजे जातकुळी ज्या आडनांवांवरून चालतात तीं आडनांवें खालीं लिहिलीं आहेत:—

| | | |
|---|---|---|
| १ सूर्यवंशी | ३ यदुवंशी | ५ प्रमारवंशी |
| २ चंद्रवंशी | ४ चव्हाणवंशी | ६ चालुक्य उर्फ सोळंखी |

| | | |
|---|---|---|
| ७ परिहारवंशी | २२ अनंगवंशी | ३७ हालावंशी |
| ८ राठोडवंशी | २३ क्रितपालवंशी | ३८ तुवरवंशी |
| ९ चावडावंशी | २४ चंडेलवंशी | ३९ वीरगुजरवंशी |
| १० गोहेलवंशी | २५ मौरीवंशी | ४० गहेरवाळवंशी |
| ११ दाबीवंशी | २६ बैसवंशी | ४१ निकुंपावंशी |
| १२ मखवाहनवंशी | २७ दाहियांवंशी | ४२ देवतवंशी |
| १३ सिलारवंशी | २८ गेहलोटवंशी | ४३ सिकरवाळवंशी |
| १४ सिंदेवंशी | २९ काठीवंशी | ४४ सद्यावंशी |
| १५ राजपालीवंशी | ३० दाहिमावंशी | ४५ कच्छवाहवंशी |
| १६ धनपालीवंशी | ३१ भगेलवंशी | ४६ सिसोदियावंशी |
| १७ अग्निपालीवंशी | ३२ जेटवावंशी | ४७ भाटीवंशी |
| १८ बालावंशी | ३३ जाडेजावंशी | ४८ तक्षकवंशी |
| १९ झालावंशी | ३४ जितवंशी | ४९ नागवंशी |
| २० अभीरवंशी | ३५ काबेवंशी | ५० बुंदेलेवंशी |
| २१ टाकवंशी | ३६ रावळवंशी | ५१ बडावंशी |

वरील शाखांमध्येंही आणखी पोटशाखा झाल्या आहेत. प्रत्येक शाखेस वंशावळ, गोत्र व आचार्य आहेत. परंतु आतां अज्ञानपणामुळें कोणास त्याची माहिती नसून, कोणीं त्यांस गोत्र, आचार्य वगैरे विचारलें तर ते, 'आमच्या भाटास विचारा,' असें उत्तर देतात. तरी या गोत्र वगैरेंची तपासणी त्यांच्या लग्नकार्यांत फार होते.

वरील वंशांतील गेहलोट हा सूर्यवंशाचा भेद असून त्यांतील राजपुरुषांस 'राणा' असा किताब आहे. हे राणे चितोड येथें राज्य करीत होते. गेहलोट हा वंश रामचंद्रापासून चालत आला आहे असें ह्मणतात. गेहलोटवंशीय कनकसेन नांवाचा राजा होता त्यानें सुमारें ८०० वर्षांपूर्वी आपला मूळचा कोसल देश सोडून काठेवाडांत येऊन वस्ती केली. या कनकसेनाचा पुढें कोणी विजय ह्मणून वंशज झाला, त्यानें विजयपूर नांवाचें एक नगर काठेवाडांत वसविलें. या ठिकाणीं पूर्वी पांडवांना आश्रय देणारा भारतप्रसिद्ध विराटराजा राहत असे. व ह्मणून काठेवाडांत विजयपुरास विराटगृह असें ह्मटलेलेंही आढळतें. पुढें गेहलोटवंशीयांनीं वल्लभीपूर ह्मणून आपली राजधानी करून 'वल्लभी' नांवाचा नवीन शक सुरू केला. हा वल्लभी शक तिकडील कितीएक ताम्रपटांवर असलेला आढळतो. वल्लभी शक विक्रम संवत् ३७५ किंवा इ० स० ३१९ यावर्षी चालू झाला असावा असा तर्क

आहे. वरील वल्लभीपूर किंवा वल्लभीनगरी ही भावनगराजवळ वळा ह्मणून जें हल्लीं गांव आहे तेथें होती असें ह्मणतात. या वल्लभीवंशांतीलच प्रसिद्ध शिलादित्य हा राजा असून तो गजनीस राज्य करीत होता. परंतु त्यास इसवी सनाच्या सहाव्या शतकामध्यें इराणचे लोकींनीं ठार मारून त्याचे वंशजांस तेथून हांकलून दिलें.

शिलादित्य मारला गेला तेव्हां त्याची बायको गरोदर असून पुढें तिला मुलगा झाला. त्याचें नांव ग्रहादित्य ठेविलें असून त्याला ईडरचें राज्य मिळालें. या ग्रहादित्यास 'ग्रहलोट' असेंही ह्मणत व त्याच नांवाचा पुन: अपभ्रंश होऊन पूर्वींचें 'गेहलोट' हें नांव त्यास मिळून गेहलोटवंश ताजा झाला. पुढें ईडराहून या ग्रहादित्याचे किंवा गेहलोटाचे वंशज भ्रष्ट झाल्यावर ते आहर येथें येऊन राहिले. आहर यास आनंदपूर असेंही नांव असून तें उदेपुराजवळ आहे. आहर येथें येऊन राहिल्यावर त्या वंशास जें पूर्वी गेहलोट हें नांव होतें तें त्यांनीं बदलून आहार्य असें नांव आपल्या वंशास लावून घेतलें. हें नांव इसवी सनाच्या बाराव्या शतकापर्यंत चाललें होतें. परंतु त्या शतकांत या आहार्य वंशांतील राहूप ह्मणून थडील मुलगा होता त्यानें आपली राजधानी चितोडशहर याजवरील हक्क व दावा मोडून तरवारीच्या जोरानें एका प्रमार राजापासून कांहीं मुलूख घेतला आणि डोंगरपूर येथें त्यानें आपली राजधानी केली. त्या राजधानीचा उपभोग व आहार्य वंशाचें नांव, त्याचा धाकटा मुलगा महूप यानें सिसोदा येथें आपली राजधानी नेईपर्यंत चाललें होतें. सिसोदा येथें राजधानी गेल्यावर त्या वंशास 'सिसोदिया' हें नांव पडलें. याप्रमाणें गेहलोट व आहार्य हीं दोन्हीं नांवें एकीकडे पडून सिसोदिया हें नांव त्या वंशास चालू झालें. हल्लीं सिसोदिया वंश प्रसिद्ध आहे, परंतु तो मूळ गेहलोट वंशाची शाखा असल्यामुळें त्या सर्व कुलास गेहलोट कुलच समजतात.

गेहलोट कुलाच्या पुढें चोवीस शाखा झाल्या. परंतु त्यांपैकीं हल्लीं फारच थोड्या सांपडतात. ह्या शाखा तरी वरील प्रकारच्या कारणांनींच झाल्या असाव्या.

यदु हा चंद्रवंशीय महापराक्रमी आणि कीर्तिमान् राजा होता. त्याचेच वंशांतील बलदेव व युधिष्ठिर हे असून त्यांचे वंशज द्वारका व दिल्ली येथें राज्य करीत होते. परंतु पुढें त्यांचा निर्वंश होऊन त्या दोन्ही ठिकाणचीं त्यांचीं राज्यें नष्ट झालीं. पण कृष्णाचे वंशजांनीं सिंधुनदीचे पलीकडे जाऊन काबुलांत आपला अंमल बसविला व त्यांनीं गजनी हें नवीन शहर वसवून तेथें आपली राजधानी केली. तशीच त्यांनीं समरकंदपर्यंत आपली वस्ती वाढविली. पुढें या कृष्णवंशजांस कित्येक यवन, पारसीक वगैरेंनीं हल्ले व स्वाऱ्या करून त्या मुलखांतून हुसकून दिल्यावर

ते पुनः पंजाबांत आले व तेथून त्यांस निघून सतलजनदीचे आलीकडे हिंदुस्थानांतील अरण्यांत यावें लागलें. असें होतां होतां त्यांनीं शेवटीं विक्रम संवत् १२१२ ह्मणजे इ० स० ११५७ सालीं जसलमीर शहर वसवून तेथें आपली राजधानी केली. हें जसलमीर शहर वसविणारे जरी कृष्णवंशज ह्मणजे यादव होते तरी त्यांनीं यापुढें यदुवंशाचें नांव टाकून 'भाटीवंश' असें नांव घेतलें.

जाडेजा कुल ही शाखा यदुवंशांतीलच असून त्या कुलाचे राजे कच्छभुज येथें राज्य करीत आहेत. या कुळाचे लोक आपला पुराणेपणा आणि दूरस्थता दाखविण्याकरितां असें सांगतात कीं, 'आह्मी शाम[1] देशांतून आलों असून इराणचा जमशीद बादशाह याचे आह्मी संबंधी आहों. आह्मी शाम येथील आरंभीं रहिवासी असून शामच्या ठिकाणीं जाम हा अपभ्रंश झाला आहे,' असें ते सांगतात. कच्छच्या राजांस जामसाहेब ह्मणतात व या राजकुलानेंच वसविलेलें जामनगर हें कच्छप्रांतांत प्रसिद्ध शहर आहे. 'जाम' या शब्दाची उत्पत्ति 'शाम'शब्दावरून आहे असें वर लिहिल्याप्रमाणें कित्येक लोक ह्मणतात; व कित्येक, जांबुवतीचे वंशज ह्मणून त्या कुलास जामकुल ह्मणण्याचा परिपाठ पडला, असेंही ह्मणतात. चंबळा नदीवरील करौली येथील राजेही जामकुलीनच आहेत. जाडेजा आडनांवाचाच जाधव हा भेद झाला असून जाधव कुलांतले लोक दक्षिणेकडेही बहुत ठिकाणीं आहेत.

तुवर हीही शाखा यदुवंशापैकींच असून ते आपल्यास पांडववंशीय असें ह्मणवितात. याच शाखेंत उज्जनीचा प्रसिद्ध राजा विक्रमादित्य झाला. पुढें तुवर ह्मणून जो राजा झाला त्यानें दिल्लीचा जीर्णोद्धार केला. विक्रमराजानें इंद्रप्रस्थ सोडून अवंती (उज्जनी) शहर आपली राजधानी केल्यापासून इंद्रप्रस्थ व दिल्ली हीं शहरें सुमारें ८०० वर्षें बहुतेक उजाड पडलीं होतीं; तीं अनंगपालानें वि० सं० ८४८ ह्मणजे इ० स० ७९२ मध्यें पुनः वसविलीं. पुढें दिल्लीस वीस राजे झाले. त्यांत शेवटचा अनंगपाल याच नांवाचा राजा होता. त्यानें आपण निपुत्रिक असें जाणून आपला दौहित्र (नातू—मुलीचा मुलगा) पृथ्वीराज चव्हाण यास, त्या वेळच्या रजपूत लोकांचे वहिवाटीप्रमाणें, बोलावून नेऊन त्याला आपलें दिल्लीचें राज्य वि० सं० १२२० ह्मणजे इ० स० ११६४ या वर्षी दिलें. ह्याप्रमाणें तुवरवंशांतून राज्यवैभव जाऊन त्याचें स्वामित्व चव्हाणवंशाकडे आलें. परंतु पुढें त्याही वंशाकडून तें नष्ट होऊन त्याचें आधिपत्य तिसऱ्याच ठिकाणीं अतिदूरच्या परदेशस्थांचे हातीं गेलें. दक्षिणेकडे कांहीं शिरके, धुमाळ, फाळके वगैरे आडनांवांचे

---

१. शामदेश ह्मणजे एशियांतील तुर्कस्थानापैकीं सीरियाप्रांत, अर्बस्थानाचे उत्तरेस.

मराठे आपल्यास तुवरवंशीय ह्मणवितात. परंतु ज्या तुवरवंशांत विक्रमादित्यासारखे यशस्वी, पराक्रमी आणि कीर्तिमान् राजे झाले, त्या तुवरवंशाचा आज ह्याप्रमाणें न्हास व्हावा हें कालमाहात्म्य विचित्र आहे ! व त्या तुवरवंशाचें ह्मणण्यासारखें स्मारक असें आज कांहींच राहूं नये हें त्या वंशाचें दुर्भाग्य होय ! पहिला अनंगपाल हा युधिष्ठिरवंशीय असून त्याच वंशांत शेवटीं अनंगपाल नांवाचाच पुरुष होऊन त्याचे योगानें पहिल्या अनंगपालाच्या नांवाचें लोकांस पुनः स्मरण दिल्यासारखें झालें. परंतु आतां त्या तुवरवंशाचें नांव देखील राहिलें नाहीं.' युधिष्ठिराचे मागें त्याचे वंशजांकडे २२५० वर्षें राज्य अबाधित चाललें होतें. एका राजवंशाला इतकें आयुष्य असा दुसरा राजवंश पृथ्वीवर सांपडणें कठीण आहे. तुवरवंशाचें स्मरण होण्याला हल्लीं काय ती चंबळानदीच्या कांठीं यमुनेचे संगमावर उजव्या बाजूस तुवरगड ह्मणून एक जागा आहे; तसेंच, जयपूरच्या राज्यांत तुवरवती पट्टन ह्मणून एक लहान संस्थान आहे. यापेक्षां दुसरें तुवरवंशाचें स्मारक कांहीं अवशिष्ट नाहीं.

राठोडवंश हा रामचंद्रपुत्र कुश याजपासून झाला, अर्थात् तो आपल्यास सूर्यवंशी ह्मणवितो. परंतु कोणी, कश्यपापासून या वंशाची उत्पत्ति आहे असेंही ह्मणतात. ह्मणिजे, हिरण्यकश्यप नांवाच्या एका दैत्याचे कन्येपासून या वंशाचें मूळ आहे असें राठोडपक्षाचे भाट ह्मणतात. तसेंच, कनोजचें राज्य स्थापन करणारा अजमीढ राजा, याचा वंशज कुशनाभ, त्याचे मागून राठोडवंशांतले राजे कनोजाचें राज्य करीत होते हें प्रसिद्ध आहे. तेव्हां कुशिक आणि राठोडवंशाचें बऱ्याच अंशानें संमेलन होतें व त्यावरून राठोडवंशजांस कोणी कौशिकवंशीय असेंही ह्मणतात. इसवी सनाचे पांचवे शतकांत राठोडवंशीय राजे कनोजास राज्य करीत होते व त्याचे पूर्वी ते कोसलदेशापैकीं अयोध्येस राज्य करीत होते अशी माहिती मिळते. कनोजास राठोडवंश राज्य करूं लागण्यापूर्वी कनोजाला गाधिपूर असें नांव असल्याचा शोध लागतो. इसवी सनाचे पांचवे शतकानंतर मात्र मुसलमानांनीं हिंदुस्थानांत शिरून जीं राज्यें घेतलीं त्यांबरोबर यांचेंही कनोज येथील राज्य घेतलें. व तोंपर्यंतचाच काय तो यांचा इतिहास सांपडतो. राठोडवंशीयांनीं दिल्लीच्या तुवरवशीय राजांशीं व चव्हाण वंशाशीं, त्याचप्रमाणें अन्हिलवाड पट्टण येथील राजांशीं लढाया मारल्याचें वर्णन आहे; शेवटीं चव्हाण कुळाचा क्षय होऊन राजछत्रधारी क्षत्रिय कुलें नष्ट झालीं, तेव्हां अर्थात् वायव्य दिशा रक्षण करण्यास कोणाचाच दरारा नाहींसा होऊन तिकडून मुसलमानांस हिंदुस्थानांत शिरण्यास मार्ग झाला. मग काय विचारावयाचें आहे ? ते जे रेंटीत रेंटीत आले ते कनोजपर्यंत सारखे निर्वेध आले. तों तेथील राजा जयचंद राठोड हा पळून जात असतां गंगेंत बुडून

मेला व त्याचा मुलगा शिवजी हा मारवाडांत पळून गेला. परंतु त्यानें तिकडे कांहीं मुलूख हस्तगत करून, मंडोरचे परिहारवंशीय राजे नाहींसे झाल्यामुळें तेथेंही त्याचें राज्य झालें. मारवाडांत राठोडकुळाचे जे राजे आहेत त्यांचा मूळ पुरुष हाच शिवजी होय. शिवजीच्या पुढें त्याचे वंशजांनीं आपलें पूर्वीचें राठोडकुळांतलें शौर्य व पराक्रम पुनः मिळवून आपलें नांव केलें. तसेंच त्यांनीं मोगल लोकांस बरेंच साह्य केलें. मोगल लोकांनीं जो कांहीं मुलूख मिळवून यश संपादिलें त्या यशाचा अर्धा अधिक भाग यां मरुदेशीय राठोडाकडे आहे असें मुसलमान इतिहास-लेखक कबूल करितात. याविषयीं त्याच लेखांत असा दाखला आहे कीं, एक वेळ एकलक्ष राठोड मोगल लोकांस साह्याला हजर होते. राठोडकुलाच्या २४ शाखा आहेतः—खोकरा, धांदल, भटेल, चकित, डुहुरिया, रामदेव, मलवत, गोगदेव, जयसिंग, काब्रिया, जोबसिया, जोरा, सुंदु, कटैचा, वगैरे. राठोडकुळाचें गोत्र गौतम, आचार्य शुक्र, आणि कुळदैवत पंखाणी देवी.

कच्छवाह किंवा कुशवाह हा वंश रामचंद्राचा द्वितीय पुत्र कुश याजपासून असल्यामुळें त्यास कुशवाह असें नांव पडलें. याचें दुसरें कच्छवाह हें नांव केवळ चुकीनें अपभ्रष्ट होऊन लोकांमध्यें आलें आहे. कुशवाह हा वंश मूळ कोसलदेशांतून बाह्यप्रदेशीं वस्ती करण्यास निघाला. ह्या वंशीयांनीं नरवरचा किल्ला बांधिला. नरवर येथें पूर्वी नलराजा राज्य करीत होता. पुढें मग मुसलमानांकडे तो मुलूख गेला. परंतु पुढें कांहीं दिवसांनीं मराठ्यांनीं तो मुलूख आपले स्वाधीन करून घेतला व हल्लीं तो शिंद्यांच्या स्वतंत्र संस्थानांत आहे. इसवी सनाच्या दहाव्या शतकांत या कुशवाहवंशापैकीं एक पुरुष अंभेर येथें गेला व तेथील मूळच्या मेणे लोकांपासून त्यानें तो मुलूख घेतला. कुशवाहवंशीय राजे दिल्लीच्या चव्हाणराजाचे मांडलिक होते. पुढें मुसलमानी झाल्यावर यांस पडती कळा आली. कुशवाह यांनींच जयपूर शहर बांधिलें. या वंशाचे पोटांत १२ उपशाखा आहेत.

प्रमार, परिहार, सोळंखी आणि चव्हाण या चार वंशांस अग्निकुळें ह्मणतात. ह्मणजे, जसें सूर्यवंश, चंद्रवंश, वगैरे ह्मणतात तसा ह्या कुलचतुष्टयास अग्निवंश ह्मणतात. हीं कुळें इसवी सनाचे पूर्वी दोनशें वर्षें हिंदुस्थानांत आलीं. तीं इकडे आल्यावर त्यांस ब्राह्मणांनीं क्षात्रधर्माची दीक्षा देऊन बौद्धधर्माचा उच्छेद करण्याकरितां त्यांची योजना केली. यांचे विषयींची प्राचीन हकीकत पालीभाषेंत असून जेथें बुद्धधर्म चालतो तेथें त्यांजविषयीं कांहींना कांहीं माहिती मिळते. हें कुळ पार्श्वनाथाचें (पारसनाथाचें) लांछन पाळतें. पार्श्वनाथ ह्मणजे जैनांच्या तीर्थंकरांपैकीं तेविसावा तीर्थंकर आणि त्याचें लांछन ह्मणजे सर्प. पार्श्वनाथ हा जरी बुद्धधर्मी

होता तरी मूळचा तो क्षत्रिय असून तक्षककुलांतील असल्यामुळें, व तक्षककुल ह्मणजे अग्निकुलांतील असल्यामुळें, अशा पुण्यपुरुषाचें लांछन बाळगण्यांत हे अग्निवंशीय लोक विशेष भूषण मानीत. सूर्यवंशीय पुरुष वैदिकधर्माचें रक्षण करण्यास जेव्हां असमर्थ झाले तेव्हां अग्निवंश ईश्वरानें निर्माण केला, अशी कथा तद्वंशीय लोक सांगतात. तरी या अग्निकुलांतील कित्येक राजे बौद्धधर्मानुवर्तीही झाले. यांत प्रारंभीं ज्या चार शाखांचा उल्लेख केला त्यांतील प्रमार ही शाखा श्रेष्ठ व कीर्तिमान् होती. दक्षिणेंत जे पंवार ह्मणून प्रसिद्ध आहेत ते या प्रमार वंशांतीलच होत. या प्रमारकुलीन राजांचीं राज्यें, महेश्वर, धार, मंडू, उज्जनी, चितोड, गिरिराज, अबू, चंद्रावती, मद्दू, परमावती, उमरकोट, बेखेर, पट्टण वगैरे अनेक ठिकाणीं होतीं. अन्हिलवाड पट्टण ह्मणजे वन्हिपूर येथील सोळंखी राजे जसे द्रव्यवान् व कर्तबगार होते, तसेच प्रमार राजेही होते. या प्रमारकुळांतील राजवंशीय शाखा फार दूरवर गेल्या आहेत. या कुळांत तीन चार भोज नांवाचे पुरुष झाले असे लेख सांपडतात. मुंजाचा मुलगा भोज याचेविषयीं तर कांहीं संशयच नाहीं. तो वि० सं० ६३१ ह्मणजे इ० स० ५७५ मध्यें झाला. नंतर दुसरा भोज त्याचे मागून ९० वर्षांनीं ह्मणजे वि० सं० ७२१ अथवा इ० स० ६६५ त झाला. आणि तिसरा भोज वि० सं० ११०० ह्मणजे इ० स० १०४४ मध्यें होऊन गेला. तरी या तीन भोजांपैकीं आपल्या सभेंत कालिदासासारखीं नऊ रत्नें बाळगणारा भोज कोणता याविषयीं पुष्कळांस शंका आहे. कारण, नऊ रत्नें बाळगण्यासारखे विद्याविलासी असे तिघेही भोज होते! असु. येथपर्यंत जे क्षत्रियकुळांतील राजे सांगितले त्यांची राज्यसीमा काय ती नर्मदेच्या उत्तरेपर्यंतच होती. परंतु चंद भाट लिहितो कीं, या प्रमारकुळांतील राम प्रमार ह्मणून एक चक्रवर्ती राजा दक्षिणेकडे तेलंगणांत होता. त्यानेंच तुवरांस दिल्ली, चावडेकुळांस पट्टण, चव्हाणांस सांभर, कामध्वजांस कन्नोज, परिहारांस मारवाड, जाधवांस सोरठ, जावळ्यांस दक्षिण, आणि चारणांस कच्छ अशा रीतीनें चोहोंकडचा मुलूख योग्य व समर्थ सरदार बघून त्यांस दिला होता असा लेख आहे. ठिकठिकाणीं जुनीं स्थळें व माहित्या मिळतात. परंतु पूर्ववैभवाचें असें आतां कोठेंच दर्शन होत नाहीं. अबूगिरीखालीं पूर्वी चंद्रावती नामक नगरी असून तेथेंही प्रमारवंशीय राजे होते असा लेख सांपडतो.

प्रमारांच्या पोटीं आणखी ३५ शाखा असून उदेपुरच्या मानकऱ्यांत प्रमारांस मोठा मान आहे. वरील ३५ शाखांपैकीं आज ज्या प्रसिद्ध आहेत त्या पुढें लिहिल्याप्रमाणें:—मोरी—या शाखेंतच प्रसिद्ध चंद्रगुप्त राजा व चितोडगडचे गेहलोटवंशीय राजांपूर्वीचे राजे झाले. सोदा—हे सिंध देशांत धातशहरीं राज्य

करीत होते. खैर–खैराळ ह्मणून जो गायकवाड सरकारचा गांव आहे तेथें हे राज्य करीत होते. हल्लीं तेथें सिद्दी मिया आहेत. उभरा व सुमरा–हे सिंधु देशांत होते, परंतु हल्लीं तेथें मुसलमान लोक आहेत. विहील–हे चंद्रावतीचे राजे होते. मैपावत–मेवाडांत बिजोली ह्मणून जें संस्थान आहे तेथें हल्लीं असलेले राजे ते याच शाखेंतील होत. काबे–सौराष्ट्र देशांत उखामंडळ प्रांतीं व द्वारकेस वाघीर ह्मणून जे लोक आहेत ते. उमटा, धुंडा, सोरठिया व हरेर–माळवा प्रांतांत ग्रास खाऊन आहेत ते लोक. ग्रास ह्मणजे गांवकरी यांनीं इनामी जमिनी दिल्या आहेत, त्या इनामांवर निर्वाह करून रखवालीचें काम करितात. बाकीच्या कित्येक शाखांचा तपास नसून कित्येक शाखा वाढून मुसलमान झाल्या. त्या सिंध, पंजाब व काबुल या प्रांतांत वसती करून आहेत.

चव्हाणवंश याला 'चाहुमान्'ही ह्मणतात. हा वंश महान् शूर जे राठोड त्यांजहूनही श्रेष्ठ आहे. चव्हाणवंशाच्या २४ उपशाखा असून त्या वंशाचीं तपसीलवार वर्णनें भाट लोकांनीं फार केलीं आहेत. बौद्धधर्माचें हिंदुस्थानांत मनस्वी प्राबल्य होऊन बहुत क्षत्रियराजांकडून त्यांचा उच्छेद करण्याविषयीं प्रयत्न झाले; तथापि त्यांस यश मिळालें नाहीं. तें यश या चव्हाणवंशानें घेतलें. चव्हाणकुलाची उत्पत्ति कशी व कोठून झाली याविषयीं निरनिराळ्या कथा आहेत. कोणी असें ह्मणतात कीं, चव्हाण हा शब्द 'चतुर्बाहु' ह्मणजे 'चतुर्भुज' यापासून झाला आहे. कोठें कोठें असें लिहिलेलें आढळतें कीं, नास्तिकांचा उपद्रव फार वाढून लोकांत वैदिक धर्माचे संबंधानें सौरक्ष्य नाहींसें झालें, तेव्हां मुनींनीं अर्बुदगिरीवर यज्ञ केला. त्या काळीं यज्ञकुंडांतून चार पुरुष निघाले व हींच चार अग्निकुलें ह्मणून जीं पुढें प्रसिद्ध झालीं, त्यांतील चव्हाण हें चौथें अग्निकुल होय. दुसऱ्या एका ठिकाणीं या चव्हाणकुलाच्या उत्पत्तीविषयीं असें लिहिलें आहे कीं, वर लिहिल्याप्रमाणें नास्तिकोच्छेदनार्थ मुनिवर्यांनीं गिरिराजावर यज्ञ केला, त्याकालीं जो यज्ञकुंडांतून पुरुष निघाला, तो 'चतुरंग'ह्मणजे चार आयुधांनीं युक्त असा निघाला. अंगांत कवच, एका हातांत धनुष्यबाण आणि दुसऱ्या हातांत पेटलेलें लांकूड, याप्रमाणें हा पुरुष निघाला. त्याचा हा वंश ह्मणून त्यास चव्हाण हें नांव पडलें. चव्हाणवंशाचे ३९ पुरुष अन्हिलपुरास झाले. त्यांत पहिला पुरुष अन्हिल नांवाचा असून शेवटचा पृथ्वीराज हा होता. हिंदूंचा शेवटचा क्षत्रिय चक्रवर्ती राजा असा काय तो पृथ्वीराजच होऊन गेला. चव्हाणकुलांतील अनेक प्रसिद्ध पुरुषांनीं अनेक महत्वाचीं व स्मरणीय कृत्यें केलीं. यांतील अजिपाल नांवाच्या राजपुरुषानें अजमीर शहर वसविलें. अजिपाल याचें राज्य सांभरप्रांतीं होतें. त्यावरून त्यांस सांबरीराव असेंही नांव पडलेलें कोठेंकोठें आढळतें. अजिपालानें अजमीर श-

हर वसविल्यावर तेथें माणिकराय नांवाचा राजा झाला. त्यानें मुसलमानांशीं बहुत युद्धें केलीं; व मुसलमानांच्या प्रारंभींच्या स्वाऱ्यांस रोध करण्याला पुढें सरलेल्या क्षत्रियांत माणिकराय हाच पहिला राजपुरुष होय. परंतु पुढें माहमूद गजनवी याची धाड जेव्हां अजमीरावर आली तेव्हां त्यास अजमीराहून सौराष्ट्रांत पळून जावें लागलें. माणिकरायावर पहिला हल्ला जो मुसलमानांनीं केला तो इसवी सनाच्या सातव्या शतकांत वालीद याचा सरदार कासम याजकडून झाला. त्यानंतर पुढें जी मुसलमानांची हिंदुराजांस डवचणी झाली ती सुमारें तीनशें वर्षांनीं झाली; आणि तिसऱ्यानें जें त्यांचें काहूर आलें तें इ० स० १०९६ त, ह्मणजे, अजमीर येथें वीसलदेव हा राज्य करीत असतां आलें. त्यावेळीं सर्व क्षत्रियराजे एकत्र होऊन या परदेशीय शत्रूंवर गेले. या वेळेस या सर्व राजमंडळांत प्रसिद्ध उदयादित्य प्रमार हाही शत्रूचे पारिपत्यार्थ आपल्या सैन्यासहवर्तमान त्यांजबरोबर होता. या मोहिमेंत क्षत्रियपक्षास जय मिळाला. या प्रसंगाची हकीकत पुराण्या दिल्लीस जो विशाळ लोखंडी जयस्तंभ आहे त्याजवर लिहिलेली आहे.

बुंदी व कोटा येथें जे हल्लीं राजे आहेत ते, चव्हाण वंशाच्या ज्या २४ उपशाखा असल्याचें या वंशवर्णनाचे प्रारंभींच सांगितलें आहे त्यांतील असून ते प्रसिद्ध आहेत. शाह जहान बादशाहाच्या सहाही मुलांनीं, दुसरा मुलगा औरंगजेब यानें जेव्हां बंड उठविलें तेव्हां, त्याचे पारिपत्यार्थ संग्रामांत आपल्या जीवांचे बळी दिल्यावर, त्या झाताऱ्यानें बुंदीकोटा येथील वर लिहिलेल्या चव्हाणराजांस आपले साह्यार्थ बोलाविलें असून त्याप्रमाणें त्यांनीं येऊन त्याचें रक्षण केलें. यामुळें तेथील राजघराण्याची मोठी प्रसिद्धि आहे. याचप्रमाणें, राघवगडचे खिची, सिरोहीचे देवरे, झालोरचे सोनगडे, सांचोरचे चव्हाण आणि पावागडचे पवैचे या सर्व चव्हाण कुलीनांनीं मुसलमानांबरोबर मोठालीं युद्धे केली आहेत. या सर्व कुळांतील घराणीं पृथ्वीराजाचे वेळींही शूरपणाविषयीं प्रसिद्ध असून आजही जीवमान आहेत. कित्येक चव्हाणवंशीयांनीं मुसलमानांच्या जुलमानें त्रासून आपापलीं संस्थानें कायम राखण्याकरितां निरुपायानें मुसलमानी धर्म स्वीकारिला. ते राजे काइमखानी, सरवाणी, लवाणी, बैदवाणे, वगैरे असून ते शेकवती प्रांतांत ह्मणजे फत्तेपूर झुंजूनीकडे आहेत. या कुळांची अशी चाल आहे कीं, आपली भूमि जर दुसरा कोणी घेत असेल तर पाहिजे तें करून वतन राखावें. व त्याप्रमाणें त्यांनीं मुसलमान होऊनही आपलीं वतनें राखिलीं. पूर्वी असे प्रसंग बहुत येत. कित्येक मुसलमानी बादशाह असे जुलमी आणि आग्रही होऊन गेले कीं, त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें राजे, संस्थानिक किंवा ग्रामाधिकारी यांस मुसलमानी धर्म स्वीकारूनच आपले परंपरेचे हक्क राखावे

लागत. व असेंही करण्यास रजपूत लोक मागें पुढें बघत नसत. ह्याप्रमाणें मुसलमान होऊन वतन, हक किंवा संस्थान राखण्याची वहिवाट पहिल्यानें पृथ्वीराज चव्हाण याचा पुतण्या ईश्वरदास ह्मणून होता त्यानें पाडिली व हकरक्षणार्थ पहिल्यानें तोच मुसलमान झाला!

चव्हाणांच्या २४ शाखा आहेत त्या:—खुद्द चव्हाण, हाडे, खिची, सोनगडे, देवरे, साचोरे, पाबिया, गोहेलवाळ, भदोरिया, नरभान, मालनी, पुरबिया, मद्रेचा, सूर, संकेचा, भूरेचा,[1] बलेचा, तुसैरा, चचैरा, रोसीहा, चंदु, निकुंपा, भावर आणि बाणकट्ट.

सोळंखी ऊर्फ चालुक्य वंश, हे भारद्वाजगोत्रज असून यांचें मूलस्थल लोहकोट ह्मणजे लाहोर आहे. हे सामवेदी असून यांचें पूज्य दैवत कपिलेश्वर महादेव आहे. इसवी सनाच्या आठव्या शतकांत हा वंश मुलतानास असून त्यांतील पुरुष भाटीक्षत्रियांशीं नेहमीं लढत असत. इ० स० ९३१ मध्यें चावडा वंशापैकीं शेवटचा भोजराज याची नक्कल होऊन त्याचा दौहित्र (नातू—मुलीचा मुलगा) मूळराज सोळंखी यास अन्हिलपुर[3] पट्टण येथें राज्यावर बसविलें. मूळराज यानें ५८ वर्षे राज्य केलें. मूळराजाचा मुलगा चामुंडराय हा अन्हिलपुरास राज्य करीत असतां महिमूद गजनवीची फौज हिंदुस्थानांत पुंडावे करण्यास शिरली व ती जिकडे तिकडे नाश करीत चालली. त्यावेळीं माहमूद यानें हिंदुस्थानांतून अपरंपार संपत्ति नेली. तथापि चामुंडरायाचे सातवे पिढीस सिद्धराज जयसिंगाचे कारकीर्दीत ह्मणजे वि० सं० ११५० पासून १२०१ पर्यंतच्या कारभारांत त्याची प्रजा आणि त्याचें भांडागार हीं द्रव्यानें यथेच्छ भरलेलीं होतीं व त्यामुळें लोक सुखांत व आरामांत होते. याविषयीं त्याकाळीं हिंदुस्थानांत अल् इद्रिसी ह्मणून एक भूगोलशास्त्रवेत्ता अरब आला

---

१. दक्षिणेकडेही अशीं कित्येक उदाहरणें सांपडतात. वांई, सातारा, फलटण वगैरे ठिकाणच्या सात देशमुखांनीं प्रसंग पडला तेव्हां मुसलमान होऊन आपलीं वतनें राखिलीं. परंतु त्यांत त्यांनीं हा विशेष विचार केला कीं, त्यांनीं आपला सर्व वंशचावंश बाटविला नाहीं; एकेक पुरुष मात्र मुसलमान करून वतनें कायम ठेविलीं. पेंठ संस्थानांतही अशीच गोष्ट घडली. तिकडे लखधीर दलपत नांवाच्या मनुष्यानें मुसलमान होऊन राज्य राखिलें.

२. दक्षिणेकडे कल्याणासही चालुक्यवंशाचे राजे राज्य करीत असत असा इतिहास असून, अन्हिलवाड पट्टण येथील चावडा राजास दत्तक देण्याकरितां कल्याणाहून चालुक्य सोळंखी वंशांतील मुलगा नेला होता. त्याचें नांव मूळराज. हा कल्याणचा राजा जयसिंग सोळंखी व त्याची पत्नी भोजराज चावड्याची कन्या यांचा पुत्र होता.

३. अन्हिलपुर हें अग्निकुळांनीं वसविलेलें असून त्याचें मूळचें नांव 'वन्हिपुर' होतें. पुढें जैन राजांच्या कारकीर्दीत मागधी भाषेनें त्या नांवाचा अपभ्रंश होऊन 'अन्हिलपुर' असें नांव बनलें.

होता त्यानें असें लिहिलें आहे कीं, 'मी सिद्धराज जयसिंग याचे दरबारांत गेलों होतों. सिद्धराज हा बौद्धधर्मी असून तो मोटा संपत्तिमान् होता. त्याचे राज्यांत व्यापार आणि देवघेव मोठी चालत असून पूर्वपश्चिमेकडील सर्व माल सिद्धराजाचे राज्यांत जमत असे.' आणि या व्यापारामुळेंच, जरी मुसलमानांनीं येवढी लूट करून पैसा वाहून नेला तरी लोक पुनः पैसेवाले झाले. सिद्धराजाचे अमलांत दक्षिणेकडे कर्नाटकपासून उत्तरेस हिमालयापर्यंत २२ राज्यें होतीं. सिद्धराजापुढें जो राजा गादीवर बसला त्यानें पृथ्वीराजाशीं तंटा केला म्हणून पृथ्वीराजानें त्याचें राज्य घेतलें आणि कुमारपाल चव्हाण याचा सोळंखीवंशांत प्रवेश झाला.

सिद्धराज व कुमारपाल यांचे राज्यांत विशाल मंदिरें आणि टोलेजंग इमारती फार बांधल्या गेल्या; व त्यांजवरून त्या काळीं ह्या देशांत कलाकौशल्य फार चांगल्या स्थितींत असून कुशल लोकांचा परिपोषही त्या वेळच्या श्रीमान् लोकांकडून चांगल्या रीतीनें होत असे. हे दोघेही राजे बौद्धधर्मी असून त्या धर्मप्रचाराचें त्या कालचें लक्षण त्या वेळच्या इमारतींवरून स्पष्ट दिसतें. अस्तु. कुमारपालाचे कारकीर्दीतच शहाबुद्दीन गोरी हा आपल्या लष्करासह त्या राज्यांत उतरला. व त्या लोकांनीं इ० स० १२२८ त हिंदूंचें राज्य नाबूद केलें. परंतु पुढें सिद्धराजाचा वंशज वीसलदेव भगेला यानें उमेद धरून मुसलमानांनीं जें जें नष्ट केलें होतें त्याचा पुनः उद्धार करून राज्य पूर्वरूपास व रंगास आणिलें. सोमनाथसंस्थानची जी वाताहत आणि दुर्दशा झाली होती ती पूर्वींच्या वैभवास पुनः आणिली; पण पुनः वीसलदेवाच्या पुढील चौथ्या पिढीस ह्मणजे कर्ण घेला याचे कारकीर्दींत अल्लाउद्दीन नामक दुसऱ्या मुसलमान सरदाराची फेरी येऊन त्यानें अन्हिलपुर अगदीं जमीनदोस्त करून टाकिलें. इतकेंच नाहीं, तर दिल्लीहून आणखी आणखी मुसलमानी फौजा येऊन त्यांनीं गुजराथ व काठेवाड या दोन्ही देशांतील पैशाची आणि धर्माची फारच लूट केली. जेथें जेथें मोठमोठीं पवित्र देवळें व देवता होत्या त्या भ्रष्ट करून व फोडून तोडून टाकिल्या. त्याचप्रमाणें पोथ्या, पुस्तकें वगैरे हिंदूंचे जुनेजुने ग्रंथ फाडून व जाळून त्यांचा सत्यानाश केला. अन्हिलपूरची दशा तरी हीच झाली. तेथील तट पाडून टाकून त्याचे पाये सुद्धां खणून काढिले आणि त्यांत मोठमोठीं देवळें व मंदिरें मोडून त्यांचे चिरे वगैरे भरिले. तशींच देवळें व मंदिरें मोडून तेथें मशिदी व पीर केले. ह्याप्रमाणें त्या काळीं सोळंखीवंश अगदीं पादाहत होऊन परागंदा झाला. त्या वेळीं गुजराथेंतही शंभर वर्षांत कोणी कायमचा राजा नव्हता. तेथें जाफरखान ह्मणून एक टाक क्षत्रियांपैकीं मुसलमान झालेला मनुष्य होता; त्यानें फौज जमा करून गुजराथेवर चाल केली व तो तेथील राजा बनला. या जाफरखानाचा अहमद ह्मणून मुलगा झाला व त्यानें अहमदाबाद वसविली.

सोळंखीवंशाची वर लिहिल्याप्रमाणें दुर्दशा झाली खरी, तरी त्यांचें बीज कोठें-कोठें आच्छादून राहिलें होतें त्यांतून कित्येक पुरुष भगेलखंडांत जाऊन राहिले ते तेथें सिद्धराजाचे वंशज ह्मणून अद्यापि राज्य करीत आहेत. त्याचप्रमाणें बांधवगड, पेठापूर, ठराद, रूपनगर, अढाळज व लूनावाडा वगैरे ठिकाणची ठाकूर मंडळीही सिद्धराजाचेच वंशांतली आहे. यांजमध्यें युद्धें व लढाया नेहमीं चालत, यामुळें त्यांचे बहुतेक पुरुष रणसंग्रामांतच रणयज्ञास बली पडले.

सोळंखी वंशांत १६ शाखा आहेत. त्यांतून आज ज्या आढळतात त्या ह्या आहेत:—भगेले ही शाखा भगेलखंडांत असून त्यांची राजधानी बांधवगड आहे. पेठापुरास असणारे ते राव. ठराद येथील ठाकूर. वीरपुरा ही शाखा लूनावाडा येथील राव ज्या वंशांत झाले ती. बेहिला या शाखेंत मेवाडांतील कल्याणपूरचे राव असून ते साळुंबरचे संस्थानिकांच्या ताब्यांत आहेत. भुरटा व कलच्या ह्या शाखा जसलमीर प्रांतीं आहेत. लंगहा ही शाखा मुलतान प्रांतीं असून ती मुसलमान झाली आहे. सरवरिया ही शाखा गिरनारप्रांतीं आहे. शिरके ही शाखा दक्षिणेंत मराठ्यांमध्यें मोडते. खरुरा ही शाखा जावडा, प्रांत माळवा, इकडे आहे. इत्यादि.

प्रीतिहार किंवा परिहार हा वंश चार अग्निकुळांपैकीं एक असून यांतील राजे दिल्लीच्या तुवरांचे व अजमीरच्या चव्हाणांचे मांडलिक होते. या मांडलिकांपैकीं नाहरराय ह्मणून एका राजानें पृथ्वीराजाशीं लढाई केली. परंतु तींत त्यास यश मिळालें नाहीं. मारवाडांत राठोड येण्याचे पूर्वी परिहार हे राज्य करीत असत व त्यांची राजधानी जोधपुराजवळ मंदावर येथें होती. हल्लीं तेथें जुनीं देवळें वगैरे मात्र कांहीं आहेत. राठोड हे कनोज येथून पळून परिहारांचे आश्रयास ह्मणून आले. परंतु पुढें त्यांचा चोंडा राठोड ह्मणून एक सरदार होता, त्यानें त्यांची राजधानी मंदावर हें घेऊन तेथें आपलें निशाण लाविलें व परिहार जर्जर झाले. ह्याप्रमाणें कधीं कधीं आश्रित लोकच डोईजड होऊन धन्याला धुळीचे दिवे खात जावें लागतें अशीं जगाच्या इतिहासांत शेंकडों उदाहरणें सांपडतील! परिहार हे ह्याप्रमाणें जर्जर झाले व त्यांचा दुसरा बहुतेक मुलूख चितोडचे रावळ यांनीं घेतला; व तसेंच त्यांजमध्यें 'राणा' हें जें पद चालत असे तेंही त्यांनीं घेतलें. आतां जी परिहारशाखा अवशिष्ट राहिली आहे ती चमेल(चंबळा)नदीच्या कांठीं असून तींतील लोक चोऱ्या, दरवडे व लुटालूट वगैरेंचा धंदा करून निर्वाह करीत; परंतु त्यांचा पुंडावा शिंद्यानें मोडला व पुढें इंग्रजांनीं त्यांजवर चांगलाच दाब बसविला. परिहारवंशाच्या बारा शाखा होत्या. त्यांतील एक दोन लूनी नदीच्या आसमंताद्भागीं कोठें कोठें आहेत असें ह्मणतात.

**चावडा** हें कुळ प्रसिद्ध आहे. परंतु हें सूर्यवंशीय आहे किंवा सोमवंशीय आहे याजविषयीं कांहीं शोध लागत नाहीं. तरी हें वल्लभीपुरचें राज्य करीत असतां यांचे वंशांत मेवाडचे सूर्यवंशीय राजांच्या मुली दिल्या होत्या व यांच्या केल्या होत्या असा दाखला मिळतो. हे चावडा कुळांतील राजे दिवबंदर[1] किंवा देवबंदर येथेंही राज्य करीत असल्याचा इतिहास आहे. हे दिव येथें राज्य करीत असतां अरब लोक काठेवाडांत व्यापाराकरितां येत असत, व एकदां त्यांचा व यांचा कलह झाला होता. पुढें दिवबंदरच्या राजानीं वि० सं० ८०२ ह्मणजे इ० स० ७४६ मध्यें पट्टण शहर बांधिलें. चावडावंशीयांनीं वल्लभीपूर येथें कांहीं दिवस राज्य करून ती राजधानी मोडून पट्टण ही राजधानी केली. या वंशांतच वनराज चावडा ह्मणून मोठा कीर्तिमान् राजा होऊन गेला. या वनराजाचा वंश १८४ वर्षे राज्योपभोग घेत होता. या मुदतींत चितोडावर मुसलमानांनीं गर्दी केली, तेव्हां या वंशांतीलच कोणी चाटनसी ह्मणून शूर पुरुषानें चितोडच्या क्षत्रियराजांस साह्य केल्याचें 'खुमान रासा' नांवाच्या बखरींत लिहिलें आहे. परंतु पुढें मुसलमानांनीं चितोडचें राज्य पालथें घातलें. माहमूद गजनवी यानें सौराष्ट्रदेशावर स्वारी करून त्याची राजधानी अन्हिलवाड घेतल्यावर तेथील राजास पदच्युत करून जो नवीन राजा बसविला, तो चावडे कुळांतलाच होता, असें मुसलमानी इतिहास लिहिणारा प्रसिद्ध फेरिस्ता यानें आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे. हिंदुस्थानांत चावडा कुळ जरी अप्रसिद्ध आहे, तरी उदेपूरच्या राण्याचें घराणें ह्मणजे सर्व रजपुतांत उच्च कुल ह्मटलें आहे, व त्यांशीं सोयरिक झाली तर तो मोठा मान ह्मणून समजतात, आणि त्या वंशांत चावडे कुळांतल्या मुली दिल्याघेतल्याबद्दल वर लिहिलेंच आहे. तेव्हां चावडे कुळ कांहीं रजपुतांत हलकें कुळ मानीत नाहींत. या कुळाचे संबंधानें हल्लींचा इतिहास ह्मणून लिहिण्यासारखा कांहीं नसून पूर्वकाळीं जो कांहीं त्यांचा कीर्तिप्रसार झाला असेल तेवढाच आज दाखल्याला आहे. त्यापेक्षां त्यांत ताजी भर कांहीं पडलेली दिसत नाहीं.

**टाक** ह्मणजे तक्षक हे फार जुन्याकाळीं बाह्य देशाहून हिंदुस्थानांत आले असा शोध लागतो. यांचें मूळ एशियांतील तुर्कस्थान ह्या देशांत असावें. पुराणांत यांस तुरुष्क व नाग असें ह्मटलेलें आढळतें. 'भारतां'तील नागवंश तो ह्याच लोकांचा वंश असावा असें दिसतें. यांस तक्षक असेंही ह्मटलेलें असून, परीक्षितराजास तक्षकानें मारिलें असें जें वर्णन आहे, तें कृत्य या तक्षकांतीलच कोणा मनुष्याचें असावें असें वाटतें. पुढें परीक्षिताचा मुलगा जनमेजय यानें तक्षकाचा सूड उगविला व तो इतिहास 'सर्पसत्र' या नांवाच्या वर्णनानें 'भारतां'त लिहिला आहे.

---

१. दिव किंवा देवबंदर हें हल्लीं पोर्च्युगीज् लोकांकडे आहे.

परंतु त्यांतील सत्य म्हटलें म्हणजे, तक्षक लोकांचा बापाचे यथार्थ जनमेजयानें सूड उगविला इतकेंच असावें. जनमेजयानें जो हा तक्षकांचा सूड उगविला त्यांत हजारों तक्षक मारले गेले; व या त्यांच्या कत्तलीस 'सत्र' असें म्हटलें असावें.

शिकंदर बादशाह जेव्हां हिंदुस्थानावर आला, तेव्हां त्याला हे तक्षकलोक क्षात्रधर्मप्रवीण असून सैन्यामध्यें भरती करण्यास योग्य आहेत असें आढळून, त्यानें त्यांस आपल्या फौजेंत घेतलें. हेच तक्षक इकडे आल्यावर सिंधप्रांतांत ठिकठिकाणीं वस्ती करून राहिले. यांस हिंदुस्थानांत आल्यावर शक असेंही म्हणण्याचा परिपाठ पडला. पुढें त्यांस भाटी नांवाच्या क्षत्रियांकडून फार उपद्रव होऊन ते सिंधप्रांत सोडून खालीं दक्षिणेकडे उतरले. शालिवाहन म्हणून जो एक शककर्ता राजा झाला तो या दक्षिणेकडे आलेल्या शक लोकांतीलच एक शूर पुरुष होता. हिंदुस्थानांत तक्षकांची वस्ती इ० स० पूर्वी ६००। ७०० वर्षांपासून होत आली असावी असें अनुमान आहे. तक्षकलोकांविषयीं 'अबूमाहात्म्य' नांवाच्या एका पौराणिकी ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, ते लोक हिमालयांतून आले. त्या तक्षकांचा सरदार शेषनाग म्हणून असून त्यांनीं चितोड घेतलें होतें. नंतर त्यांजपासून गेहलोट यांनीं चितोडगड घेतला. मुसलमानांबरोबर क्षत्रियांच्या ज्या लढाया झाल्या, त्यांत अशीरगडचा टाक होता म्हणून लिहिलें आहे. तक्षक किंवा टाक या कुळांतील जे पुरुष मुसलमान झाले त्यांनीं अहमदाबादची मुसलमानी बादशाही संपादिली. 'भारतां'त नागकन्या व नागराज म्हणून जे वर्णिले आहेत ते या तक्षकवंशांतीलच सुंदर स्त्रीपुरुष होत.

जित हे लोक आपल्यास रजपूत म्हणवीत नसून त्यांचा रजपूतांशीं कांहीं संबंधही नाहीं. हल्लीं जे जित आहेत ते शेतभात वगैरे कामधंदा करून इतर संसारिक लोकांप्रमाणें राहतात. जित लोकांसच 'जाट लोक' असें म्हणतात. या वंशाचे लोक सिंधप्रांतांत फार असून ते मुसलमान झाले आहेत. हे लोक जरी रजपूत म्हणवीत नाहींत तरी क्षत्रियकुळांतील आपण असून छत्तीस राजकुळांपैकीं यदुवं-

१. पूर्वी त्रासलेले व भयभीत झालेले राजे, द्वेषबुद्धीनें याप्रमाणें शत्रूंचा सूड मोठ्या कडक रीतीनें घेत. मग तेथें दयाभूतता किंवा क्षमा म्हणून यत्किंचित्‌ही वसत नसे. भरतपूरचे जाटानें गुजरगडचे लोक मारून विहिरी भरल्या; बापू गोखले व कादर भालदार यांनीं पुरंदरचे रामोशी आणि खानदेशचे भील यांस दंग्यामुळें मारून हजारोंची कत्तल केल्याचें प्रसिद्ध आहे; व याचप्रमाणें १८५७ सालच्या बंडानें इंग्रजसरकारानें भिऊन व कातावून अंमलदारांस, कोणी बंडखोर भेटल्यास किंवा संशय आल्यास एकदम फांशीं देण्याचा अधिकार दिला होता. व त्यावेळीं हजारों लोक बदमाष म्हणून फांशीं चढविण्यांत आले. असा दुस्मानांचा फन्ना उडविला, त्यालाच 'भारतां'त 'सत्र' म्हटलें यापेक्षां दुसरें कांहीं नाहीं.

शांतले आहेत असें ह्मणतात. या जाट लोकांनीं माहमूद गजनवी याशीं बहुत युद्धें केलीं व कांहीं दिवस बिकानीर येथें राज्य केलें. पूर्वी हे समरकंदाकडे राहत असून तोगलतष व तैमुरलंग यांची तार्तरींत जी गर्दी झाली त्यामध्यें ते सांपडले. तेव्हां त्या गर्दींत त्यांजपैकीं कितीएक मेले, कितीएक पळून गेले व कित्येक मुसलमान झाले. त्यांत पळून गेले ते पंजाब वगैरे हिंदुस्थानांतील प्रांतांत आले, ते अद्यापि आहेत. जाट लोकांचें हत्यार चक्र असून तें ते इतर लोकांप्रमाणें पूजितात.

हूण हे राजकुळांत गणले जात नसून ते फक्त क्षत्रियांचे साहाय्यास सेनेबरोबर असत. पुढें हे बलिष्ठ झाले. परंतु बहारच्या राजानें जे कित्येक जय मिळविले, त्यांत त्यांनीं हूणांची मस्ती मोडली असा एका ठिकाणीं इतिहास सांपडतो. चितोडावर मुसलमानांनीं जी पहिल्यानें गर्दी केली त्या वेळीं तेथें अंगटसी नांवाचा हूणांचा राजा होता असें तिकडील इतिहासांत लिहिलें आहे. या हूणांचीं अजूनही कोठें कोठें ठिकाणें व वस्ती आढळते.

काठीलोकांनीं सौराष्ट्र देशीं वस्ती केल्यामुळें त्या देशास 'काठेवाड' असें नांव पडलें आहे. हे इसवी सनाचे आठवे शतकांत सौराष्ट्र प्रदेशांत आले असा दाखला सांपडतो. हे पृथ्वीराज चव्हाण याजबरोबर असून त्यानें ज्या लढाया केल्या त्यांमध्यें होते. हे घोड्यावर बसणारे वस्ताद व चपल आहेत. काठीलोकांची गणना लुटारू लोकांत करितात.

बाला नांवाचें एक कुळ असून तें पूर्वी सिंधुनदीचे तीरीं होतें व तेथून पुढें वल्लभीपुरांत आलें असा दाखला सांपडतो.

झाला हें एक कुळ असून त्यांतील लोकांनीं राणा प्रतापसिंह याजला अकबराशीं लढाया करण्यांत साह्य केलें होतें, व ह्मणून त्या राण्यानें यांतील एकास आपली कन्या देऊन त्यास आपल्या उजव्या बाजूस बसण्याचा मान ठरविला होता. कोटासंस्थानीं झाला लोक असून काठेवाडांत झालावाड ह्मणून एक प्रांतच आहे. झालावाड प्रांतांत वांकानीर, हलवद, व ध्रांगध्रा हीं शहरें आहेत. हेही पृथ्वीराजाबरोबर होते.

जेटवा या कुलाची काठेवाडांत वस्ती असून पोरबंदरचा राणा याच कुळांतला आहे. इसवी सनाचे आठवे शतकापासून हे प्रसिद्ध आहेत. हे आपल्यास हनुमानाचे वंशज ह्मणवितात. यांच्या कन्या दिल्लीचे उमरावांस दिल्या आहेत.

गोहेल हें राजकुल सूर्यवंशी असून तें पूर्वी मारवाडांत होतें व पुढें सौराष्ट्रांत आलें. काठेवाडांत जो प्रदेश यांनीं वसविला त्यास गोहेलवाड प्रांत ह्मणतात. सीहोर, भावनगर व नांदोड येथील राजे गोहेलवंशीयच आहेत.

सिलार हें एक राजकुल असून तें कुल, प्राचीन मिसरदेशचे टॉलमी आणि युरोपांतले इतर ज्योतिर्विद् आणि भूगोलज्ञ दोनहजार वर्षांपूर्वी जेव्हां हिंदुस्थानभूमि पहावयास इकडे आले, तेव्हां त्यांस माहीत होतें. त्याचप्रमाणें हें कुल सौराष्ट्र देशांत होतें हेंही त्यांस समजलें होतें. पुढें या कुळाला सिद्धराजानें घालवून दिलें. दक्षिणेकडे जे या कुळांतील वंश आहेत त्यांस 'शेलार' ह्मणतात.

दाबी या वंशाचें अस्तित्व हल्लीं कोठेंच नसून पूर्वीचे जुन्या लेखांत याचें नांव आढळतें व त्यावरून ते सोमवंशी असावेत असें दिसतें.

गोर या राजकुळांतले पुरुष बंगाल्यांत राज्य करीत असत. पृथ्वीराजाबरोबरही अजमीरचे गोर होते असें पृथ्वीराजाचे इतिहासांत सांपडतें. हे पूर्वी मोठे शूर होते. परंतु पुढें त्यांनीं वैष्णवी दीक्षा घेऊन मांसाहार सोडून दिला व राधाकृष्णांच्या लीला व तत्प्रतिपादक ग्रंथ यांचें अध्ययन करूं लागले. यांचें सुपुर येथें छोटेंसें राज्य होतें तें इ० स० १८०९ सालीं त्यांजपासून शिंद्यानें घेतलें.

दोडा हें राजकुळ पृथ्वीराजाचे वेळेस होतें.

गहेरवाळ या कुळांतील राजे काशी येथें राज्य करीत होते. गहेरवाळ वंशांतीलच बुंदेले हे असून त्यांचे प्रांतास बुंदेलखंड असें ह्मणतात. यांनीं कालिंजर, मोहिनी व महोबा हीं शहरें चंडेले यांजपासून घेऊन तेथें राज्य केलें. चंडेले हे रजपुतांच्या ३६ कुळांपैकींच एक असून इसवी सनाच्या बाराव्या शतकांत हे यमुना आणि नर्मदा यांचे मधील प्रदेशांत राज्य करीत होते. तो प्रदेश हल्लीं बुंदेलखंड आणि भगेलखंड यांजमध्यें मोडतो. या चंडेलांचें पृथ्वीराजाबरोबर युद्ध झालें व त्यांत त्यांचा पराभव होऊन त्यांचें राज्य वर लिहिल्याप्रमाणें गहेरवाळ यांचेकडे आलें. इ० स० १२०० मध्यें गहेरवाळ वंशांतील पुरुष मनवीर बुंदेला हा चंडेलांचें राज्य करीत होता. मनवीरामागून तेरावा पुरुष मधुकर या नांवाचा झाला; त्यानें बेटवा नदीवर ओर्चा ह्मणून शहर वसविलें. व तें शहर मधुकराचा मुलगा वीरसिंगदेव याचे कारकीर्दींत फार भरभराटीस आलें होतें. ओर्चा हें शहर बुंदेलखंडांत जीं मोठालीं व विख्यात शहरें आहेत त्यांत मोडतें. मधुकरानें ओर्चा शहर वसविलें वगैरे त्याची मोठी कीर्ति आहे. परंतु त्यानें एक अत्यंत निंद्य कर्म केलें व त्याचा जो कालिमा त्याला लागला तो त्याचे नांवास पुरा खिळला गेला. ह्मणजे, त्यानें अकबर बादशाहाचे प्रीतींतला इतिहासलेखक व त्याचा मित्र अबुल फझल ह्मणून होता त्याला ठार मारविलें. शिवाय अबुल हा ह्मणजे हिंदुलोकांचा द्वेष्टा नसून अकबराप्रमाणेंच त्यांचा अभिमानी

१. हें कुळ काशी येथें राज्य करीत होतें असें वर लिहिलेंच आहे. हे लोक आपणांस वेदप्रसिद्ध दिवोदासाचे वंशज ह्मणवितात. हा दिवोदास काशी येथेंच राज्य करीत होता.

**होता. अशा मनुष्याला मधुकरानें ज्याअर्थी मारविलें त्याअर्थी त्यासंबंधानें त्याला कालिमा लागणें साहजिकच होतें.**

**ओर्चा** आणि **दत्तिया** येथील **बुंदेले** लोक मोठे शूर ह्मणून प्रसिद्ध होते. **ओर्चा** येथील **भगवान् बुंदेला** ह्मणून एक शूर व वीर पुरुष, **अकबराचा** नातू **शाहजहान** याचे फौजेंत, सैनापत्याच्या अधिकारावर होता; व त्याचप्रमाणें **भगवा**नाचा मुलगा **सूपकर्ण** ह्मणून होता, तो **औरंगजेबाच्या** दक्षिणेकडील सैन्यावर सेनानायक ह्मणून होता. याप्रमाणें हे मोठे शूर होते. **हिंदुस्थानांतील** प्रसिद्ध योद्धा **महादजी शिंदा** वारल्यानंतर त्याचे मागून **दौलतराव शिंदा** गादीवर बसला. परंतु त्याच्या भीतीनें **महादजीच्या** बायका **दत्तियाच्या** राजाकडे आश्रयार्थ गेल्या व त्यानें त्यांस **महादजीच्या** पूर्वलोभावरून आश्रय दिला. पुढें **दौलतरावानें** त्या बाया आपल्या ताब्यांत देण्याविषयीं **दत्तियाच्या** राजाशीं बोलणें लाविलें. परंतु त्यानें एकच 'नाहीं' ह्मणून उत्तर दिलें. तेव्हां अर्थात् **दौलतराव शिंदा** हा त्याजबरोबर युद्धास सिद्ध झाला. परतु **दत्तियाचा** राजाही त्यास न भितां आपले तीनशें घोडेस्वार घेऊन त्याशीं सामना करण्यास पुढें आला. या लढाईत तो जखमी होऊन पडला, परंतु मागें गेला नाहीं; असा तो अभिमानी असे. तो जखमी झाल्यावर त्यास राजवाड्यांत नेत होते; पण तो ह्मणाला, 'काय होणें असेल तें येथेंच होऊं द्या; मला घरीं नेऊं नका.' तो शत्रूला ह्मणून शरण गेला नाहीं व कोणाच्या साह्याची ह्मणून त्यानें कधीं पर्वा केली नाहीं. असें ह्या **दत्तिया** येथील **बुंदेलवंशीय** पुरुषांचें धैर्य व शौर्य होतें. या **बुंदेल्यांचा** इतिहास ह्मणजे कांहीं विशेषसा नाहीं. हल्लीं **गहेरवाळ** हें नांव बहुश: अगदीं लुप्त होऊन त्यांचे जागीं **बुंदेले** हेंच नांव प्रसिद्ध आहे.

**वीरगुजर** हे, **रामचंद्राचा** पुत्र **लव** याचे कुळांतील, अतएव, **सूर्यवंशीय** आहेत असें ह्मणतात. यांची **धुंडारप्रांतीं**[१] वस्ती असून **राजोरचा**[२] किल्ला त्यांचा होता. त्याप्रमाणेंच **राजगड** आणि **अलवर** हे किल्लेही त्यांचेच ताब्यांत होते. या लोकांस **कच्छवाहांनीं** हुसकून दिल्यावर त्यांनीं **गंगा(भागीरथी)**नदीच्या कांठीं **अनोपशहर** ह्मणून एक नवीनच नगर वसवून त्यांत वस्ती केली.

**सेंगार** या लोकांविषयीं फारशी कांहीं माहिती नसून ते **यमुनातीरीं जगमोहनपुर** येथें आहेत, इतका मात्र शोध लागतो.

---

१. धुंडार प्रांत ह्मणजे अंमेर अथवा जयपुर प्रांत वगैरे ज्या भागांत आहेत तो.

२. राजोर हें स्थान राजगडापासून सुमारें ७-८ कोशांवर असून तेथील हकीकत मिळविण्याकरितां मुद्दाम एक मनुष्य पाठविला होता. त्यानें सांगितलें कीं, 'तेथील नीलकंठ महादेवाचे देवळांत त्या संबंधाचे कांहीं लेख आहेत.'

सिकरवाळ या राजकुळाकडे हल्लीं कांहीं अधिकार राहिला नसून ग्वाल्हेर प्रांतांत ते वस्ती करून आहेत. यांच्या कुळाची राजस्थानच्या इतिहासांत फारशी प्रसिद्धि नसून ते चंबळा नदीच्या उजवे बाजूस यदुवती नगराजवळच सिकरवाड नांवाच्या गांवांत राहत होते. सिकरवाळ हे लोक शेतीभाती करून उदरनिर्वाह करितात. हे पूर्वी फत्तेपूर सिकरी येथें राज्य करीत होते[१] म्हणून त्यांस सिकरवाले (सिकरवाळ) असें म्हणतात.

बैस हे छत्तीस क्षत्रियकुळांतील आहेत असें मानितात. परंतु चंदानें जी छत्तीस कुळांची यादी दिली आहे त्या यादींत यांचें नांव नाहीं; इतकेंच नाहीं, तर 'कुमारपाळचरित्र' नांवाच्या ग्रंथांतही त्यांचें नांव नाहीं. यावरून ते छत्तीस कुळांचे जे आणखी शाखाभेद आहेत त्यांजपैकीं असतील. यांचे प्रांतास बैसवाड म्हणतात. बैसवाड हा प्रांत गंगायमुनेच्या मधील अंतर्वेद म्हणून जो भाग आहे त्यांत आहे.

दाहिया हे छत्तीस कुळांपैकीं आहेत परंतु यांचें कोठेंही राज्य वगैरे कांहीं नाहीं. हे पूर्वी शत्रुंज नदीवर होते असा जसलमीरच्या भाटीवंशाचे इतिहासांत दाखला सांपडतो.

जोहिया हें राजकुळ पूर्वी सिंधुनदीतीरीं होतें. हे लोक दाहियांचे बरोबरच होते. यांनीं उत्तर हिंदुस्थानांतील मैदानांत वस्ती केली व त्यावरून त्यांस 'जंगलदेशाधिपति' असेंही म्हणण्याचा परिपाठ पडला होता.

मोहिल हें राजकुळ मुलतानाकडे असून 'मुलतान' हें नांव 'मोहिलस्थान' यावरूनच झालें असावें असें वाटतें.

निकुंपा हें कुळ प्राचीनकाळीं मांडेलगडावर असून तें गेहलोतांच्या पूर्वी होऊन गेलें असा शोध लागतो.

राजपाली व दाहिरिया हीं राजकुळें रजपुतांच्या ग्रंथांतून असून तीं कुळें चितोडगडचे युद्धांत होतीं.

दाहिमा या राजकुळांतील सरदार पृथ्वीराज चव्हाण याजबरोबर मांडलिकांमध्यें असत. याच वंशांतील पृथ्वीराजाचा मुख्य प्रधान कयमाष म्हणून होता. परंतु तो शेवटीं एका स्त्रीमात्सर्यानें आपल्या राजाचेच हातानें मारला गेला. कयमाषाचे आणखी दोघे भाऊ पुंडीर व चामुंडराय नांवाचे त्याच्या सारखेच पराक्रमी असून पृथ्वीराजाचे सैन्यांत अग्रेसर होते. पुंडीर हा पृथ्वीराजाचें सैन्य घेऊन सरहद्दीवर

---

१. फत्तेपुर व सिकरी हीं गांवें आग्र्याहून दहा कोस असून तेथें अकबराचा वाडा आहे. या वाड्याचा बुलंद दरवाजा व हिंदुराजपुताणी, ब्राह्मणी व ख्रिस्तीयनी ह्या राण्यांचे महाल, त्याचप्रमाणें दरबार व भजनालय ही बहुत सुंदर आहेत.

२. तो इतिहास लोकहितवादीकृत 'पृथ्वीराज चव्हाण यांचे इतिहासां'त विस्तारानें लिहिला आहे.

लाहोराकडे गेला होता व चामुंडराय हा तर शेवटीं पृथ्वीराज ज्या लढाईंत पडला त्यांत त्याजबरोबर होता. असा या दाहिमाकुळाचा त्यांतील शूर व वीर पुरुषांच्या योगानें मोठा लौकिक होता.

याप्रमाणें क्षत्रियकुळांची माहिती जी जी मिळाली ती अल्पविस्तारानें दिली. व तिजवरून हल्लीं राजस्थानांत जे रजपूत आहेत ते या सांगितलेल्या निरनिराळ्या कुळांतीलच असून त्यांचे पूर्वज मोठे पराक्रमी व फार जुने असल्याविषयींची माहिती समजेल.

राजस्थानांतील मूळचे राहणारे लोक रजपूत व क्षत्रिय नसून वाघ्री, मेर, काबे, मेणे, भील, थोरी, खंगार, गोंड व सारद वगैरे होते.

राजस्थानांत शेतकी व गुरें राखण्याचे वगैरे धंदे करणारे लोक जाट, अहीर किंवा अभीर, गोला, कुळंबी, गुजर, वगैरे जातीचे आहेत.

राजस्थानांत जे नुस्ते रजपूत जातीचे असून ज्यांचे शाखाभेद माहीत नाहींत असे जाळिया, पेशानी, चाहीरा, रान, बूसा, बिरगोटा वगैरे भेदांचे रजपूत आहेत.

राजस्थानांत वाण्यांच्या जाती ८४ आहेत, त्यांतील प्रसिद्ध ह्या आहेतः—श्रीमाळी, ओसवाळ, भगेरवाळ, पुष्करवाळ, मेरटवाळ, भुंगरवाळ, पिलीवाळ, खंडेलवाळ, ढीसावाळ, खेडरवाळ, गुजरवाळ, अगरवाळ, बोरवाळ, जाइलवाळ, मानतवाळ, छत्रावाळ, सोजतवाळ, पंचमवाळ, कुंबोवाळ, ठाकुरवाळ, भगेलवाळ, गोइलवाळ, मोहरवाळ, ओरवाळ, बामनवाळ, लाड, कपोळ, नागर, खडाइता, मेवाड, नरसिंगपुरा, दिंडोरिया, वगैरे.

येणेंप्रमाणें राजस्थानांतील कुळें, जाती वगैरेंची माहिती झाली.

---

# भाग चौथा.

## राजस्थानांतील रीतिभाती.

राजस्थानांतील पूर्वीच्या रीतिभाती आणि प्रस्तुतची व्यवस्था.—सिसोदिया वंशाला समकालीन राजे.—अंबेरचे कच्छवाह.—रजपुतांच्या चालीरीति.—रजपुतांच्या युद्धाच्या रीति.—रजपुतांची स्थावर जिंदगी.—चौथरा किंवा कचेरीच्या जागा.—रजपुतांचें शौर्य.—मुकटावत व चोंडावत.—रजपुतांचा मुसलमानी दरबारांत मान.—रजपुतांचा व मुसलमानांचा बेटीव्यवहार.—हिंदुस्थानांत इंग्रजांचा पाय.—रजपुतांचें दिल्लीचे बादशाहीस साह्य.—मुसलमानांची पडती व रजपुतांचा उदय.—रजपुतांची लौकिकी व गृहसंबंधी राहटी.—रजपूत स्त्रियांचें पातिव्रत्य.—रजपूत लोकांचे दुर्गुण.—रजपुतांची स्वामिभक्ति.—रजपुतांचें राज्यकर्तृत्व व चातुर्य.—रजपूत राजांचे कारभारी.—राजपुत्रांच्या शिक्षणाविषयीं सूचना.—राजा व प्रजा यांचें ऐकमत्य.—रजपुतांचा आत्मभिमान व बंधुप्रीति.—प्राचीनकाळीं हिंदुस्थानाविषयीं दूरवर माहिती आणि तिकडचा

त्याशीं संबंध.—वल्लभीपुर व तेथील शक.—शिवाजीचा व रजपूत कुलाचा संबंध.—रजपूत स्त्रियांची मर्यादा.—रजपुतांचें जातिबांधवांस प्रसंगीं साह्य.—त्यांचें अंकित शत्रूशीं वर्तन.—वयातीत रजपूत राजांची रीति.—रजपुतांमधील रक्षाबंधनाची चाल.—त्यांचें एकपात्रभोजन.—राज्याभिषेकाचा समारंभ.—मुहूर्तांचें महत्व.—उपसंहार.

येथपर्यंत राजस्थानांतील जाती वगैरेंची संक्षिप्त रीतीनें माहिती सांगितली. या पुढें राजस्थानांतील पूर्वींच्या रीतीभातींची आणि प्रस्तुतच्या व्यवस्थेची माहिती देऊन हा भाग आटोपूं.

राजस्थानांतील सर्व संस्थानें हल्लीं इंग्रज सरकाराकडे असून तीं हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल यांचे एजंटाचे ताब्यांत दिलेलीं आहेत. या एजंटाचे हाताखालीं आणखी पंधरा वीस असिस्टंट्स् ह्मणजे मदतनवीस दिलेले असतात. या एजंटाचें मुख्य ठाणें अजमीर येथें असून उन्हाळ्यांत अबूपहाडावर असतें. खुद्द अजमीर व त्याचे भोंवतालचीं कांहीं खेडीं हीं मात्र इंग्रजांच्या अमलाखालीं असून राजस्थानांतलीं बाकीचीं सर्व संस्थानें रजपूत राजांचेच अमलाखालीं ठेविलीं आहेत.

राजपुताना हा मुलूख रेताड आहे; तरी त्यांत गहूं, हरभरा, जव वगैरे धान्यें पिकतात. यांत चार पांच भाषा चालतात. राजपुतान्यांत कायदेकानू वगैरे कांहीं नसून वहिवाटीप्रमाणें राज्यकारभार चालतो. रजपूत लोकांमध्यें इतर कारभारांपेक्षां आपसांतील तंटेबखेडे, मानपान वगैरे संबंधाच्या कोत्या समजुती आणि असेच निरर्थक वाद पूर्वी फार असत. परंतु हल्लीं त्यांचे डोकीवर जबरदस्त सरकार असल्यामुळें त्यांच्या पूर्वींच्या समजुती, हट्ट आणि आग्रह नाहींसे होत चालले आहेत. पूर्वीं जेव्हां रजपुतांस जबरदस्त आटोपणारा ह्मणून कोणी नव्हता तेव्हां त्यांची लठ्ठालठ्ठी, हाणाहाणी आणि मारामारी फार चालून मोठमोठीं रणें माजत व कुलक्षय होत. आणि त्यामुळें मोठाल्या अदावती व दीर्घ द्वेष वाढून ते आपसांतील कलह परंपरेनें चालत.

रजपूत लोकांमधील ज्या कुलांची त्रोटक माहिती पूर्वभागांत दिली, त्यांतील कांहीं कुळें मूळचीं या देशांतील नसून बाहेरून इकडे आलीं असें सांगितलें. परंतु हें हल्लींच्या वहिवाटीकडे बघितलें तर चमत्कारिक वाटेल. कारण, हिंदुस्थानांत बाहेरच्या जाती आणि कुळें आलेलीं इकडील मूळच्या जातींमध्यें आणि कुलांत बिलकुल मिसळलीं जात नाहींत अशी हल्लीं जबरदस्त रूढी असलेली दिसते. तेव्हां हें होईल कसें ? अशी शंका येण्याचा संभव आहे. परंतु त्यांत विशेष नाहीं. पूर्वी हल्लींच्या इतकी जातीसंबंधानें तपासणी आणि चिकित्सा नसून समानधर्मावरून इकडील निरनिराळ्या जातींत बाहेरून आलेल्या लोकांचा समावेश होत असे, असें सा-

धारणतः क्षत्रिय व रजपूत यांच्या कुलवर्णनावरून सहज लक्ष्यांत येण्यासारखें आहे. ह्याप्रमाणें बाहेरून येणाऱ्या जातींचा समावेश ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांजमध्यें त्यावेळीं निःशंकपणें होत असे असें दिसतें. कारण, येथील लोकांचे आहारविहार ह्या परदेशांतून आलेल्या लोकांच्या आहारविहारांशीं सदृश असल्यामुळें त्यांचा इकडील लोकांमध्यें समावेश झाला असावा व हेंही कांहीं असंभाव्य नव्हतें. परंतु हल्लीं असा प्रकार अगदीं होणार नाहीं. जातींचीं बंधारणें पूर्वीपेक्षां हल्लीं विशेष दृढतर झाल्यामुळें बाहेरच्या लोकांचा समावेश इकडील लोकांत आतां होण्याचा काळ नाहीं. वरील समावेश तरी मोठा आश्चर्यकारक आहे असें नाहीं. जे लोक पोटाचे मागें लागून परमुलखीं रहाण्यास गेले ते आपल्या मूळच्या जातीविषयीं आणि देशाविषयीं बहुशः उदासीन असतात. ही गोष्ट, युरोपखंडांतील निरनिराळ्या देशांतून बाह्यप्रदेशीं वसाहत करण्यास जे लोक गेले त्यांच्या आचरणावरून सहज दिसून येईल. हीच गोष्ट या क्षत्रियादि कुलांत मिळालेल्या बाहेरच्या जातींचीही आहे. लढाईच्या उपयोगी पडणारे वीर व शूर लोक जेवढे आले तेवढे सर्व या क्षात्रकुलांत समाविष्ट होऊन त्यांना त्यांजबरोबरच अधिकार, वैभव आणि कीर्ति हीं मिळालीं व ते जणूंकाय याच देशांतले असे बनून गेले यांत नवल नाहीं. ही गोष्ट वाचकानीं लक्ष्यांत धरण्यासारखी आहे. तशीच हीही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, मोठमोठ्या राजकारणाच्या प्रसंगांत जातिभेद वगैरेंकडे साहजिक दुर्लक्ष्य होऊन कोणीकडून तरी वेळ मारून नेण्याकडे विचारी पुरुषांचें धोरण असतें. ह्या गोष्टी तसल्या प्रसंगांत ज वहिवाटलेले आणि अनुभविक आहेत त्यांस पूर्णपणें कळतात. रजपूत व क्षत्रिय राजकुलांनीं आपल्या मुली मुसलमानी बादशाहांस दिल्या त्या तरी तसे कांहीं अनिवार प्रसंग टाळण्याकरितांच. रजपूत लोकांत अशाप्रकारें आपल्या मुली मुसलमानांस न देतां, येईल तसा प्रसंग बाण्यानें सोशीत राहिलेलें असें आजपर्यंत सिसोदिया हें कुळ मात्र निष्कलंक राहिलें आहे. या कुळाची माहिती पूर्वभागांत, निरनिराळ्या वंशवर्णनाचे प्रारंभींच पहिलें कुळ ह्मणून दिली आहे व तो त्यांचा पहिला मान त्यांच्या अभिमानावरून त्यांस अगदीं योग्य आहे. सिसोदिया कुळांतील पुरुषांच्या अभिमानानें त्यांस अनेक प्रकारचीं संकटें व आपत्ति भोगाव्या लागल्या. त्यांचें राज्यवैभव व राज्यविस्तार हीं नष्ट होऊन ते फार विपन्न स्थितींत आले; तरी त्यांनीं ह्मणून आपला अहंभाव आणि ब्रीद सोडिलें नाहीं. असु.

सिसोदियावंश उदेपुरास राज्य करीत असतां त्या काळीं दिल्लीच्या बादशाहाचा दरारा, वैभव, कीर्ति आणि संपत्ति हीं अनुपम होतीं. अकबराचा पुत्र सेलीम ऊर्फ जहानगीर हा जेव्हां राज्य करीत होता, तेव्हां त्याला समकालीन इंग्लंडांत

इलिझाबेथ राणी ही असून ती तेथें राज्य करीत असे. तिनें जहानगीर बादशाहाचे दरबारीं कोणी सर टॉमस् रो नांवाचा आपला वकील पाठविला होता. तो दिल्लीस आल्यावर त्याणें तेथील दरबारचें वैभव आणि संपत्ति वगैरे पाहून जें लिहून ठेविलें त्याजवरून बघितलें असतां बादशाहाचें ऐश्वर्य अनुपम होतें असें दिसेल ! त्यावेळीं युरोपांत जीं राष्ट्रें आज वर डोकीं काढून जगावर आपली विद्वत्ता, संपत्ति आणि कर्तबगारी दाखविण्यांत डौल मिरवीत आहेत त्यांचा ठिकाणही नव्हता. त्याच वेळीं राजस्थानांत मोठमोठीं राज्यें आणि मोठालीं व श्रीमान् संस्थानें होतीं. हल्लीं राठोडवंशीय राजे मारवाडांत सिसोदियवंशासारखे राज्य करीत आहेत. परंतु त्यावेळीं ते कनोज येथें राज्य करीत असून त्यांची मोठी भरभराट होती.

अंभेर येथील कच्छवाह हे फार प्राचीन असून त्यांजमध्यें मुख्य राज्याधिकारी असेल त्यास टिकाईत ह्मणण्याची वहिवाट आहे; आणि त्याचे भावाबंदांस पट्टावत किंवा भायाद ह्मणण्याची रीति आहे. या भावाबंदांस गांवखेडीं तोडून दिलेलीं असतात. युरोपांत वगैरे ठिकाणींही राजाचे भावाबंदांचे संबंधानें पूर्वींपासूनची हीच रीति दृष्टीस पडते. भाऊबंद किंवा सरदार जे असतील त्यांस, अमुक पायदळ व अमुक स्वार घेऊन राजाची नौकरी केली पाहिजे असा निर्बंध असतो, व त्याप्रमाणें हे भाऊबंद आणि सरदारच राज्याचे संरक्षक होतात. ही रीति राजस्थानांत फार दृष्टीस पडते.

रजपूत लोकांस आपण प्राचीन सूर्यचंद्रवंशीय रामचंद्र, यदु व पांडव यांचे कुळांतील आहोंत असा मोठा अभिमान असल्यामुळें त्यांजमध्यें कितीही दरिद्री आणि भिकारी झाला तरी तो नांगर धरील किंवा दुसरे असेच कावाडकष्टाचे धंदे करील असें कधीं होणार नाहीं. प्रत्येक खऱ्या रजपुताची—मग तो श्रीमान् असो अथवा अगदीं गरीब असो—घोड्यावर बसून भाला व तीरकमठा हीं आयुधें धारण करावीं हीच उमेद असून यांतच काय तें आपलें कर्तव्य आहे असें तो समजतो. रजपूत लोकांपैकीं जे कित्येक प्राचीन सरदार व शूर ह्मणून नांवाजलेले लोक असतात त्या कित्येकांस डंके, निशाणें वगैरे असून, कित्येकांचे घरीं, पूर्वीं रणांत जे शंख वाजवीत होते ते शंख अजून तसेच आहेत. रजपुतांचे ठाकुरांच्या (राजांच्या) स्वाऱ्या निघाल्या ह्मणजे त्या स्वाऱ्यांचा थाटही मोठा भव्य असतो. चोपदारांचें ललकारणें आणि भाटांचे स्तुतिपाठ यांची गर्दी चालू असते व त्याजमध्येंच नानाविध वाद्यांचे आवाज मिसळून जात असतात. तशींच नानाप्रकारचीं निशाणें फडकत असतात; व सर्वांचे हातांत तीर, भाले व तरवारी वगैरे शोभत असतात. सर्व रजपूत राजांचीं एकसारखींच निशाणें असत नाहींत. प्रत्येक राजाचें निशाण निरनिराळें अ-

सतें. उदेपूरच्या राण्याचे निशाणावर सूर्य असतो; जयपूरचें निशाण पंचरंगी आहे; व चंदेरीच्याही राजाचे निशाणावर सिंह असे; परंतु तें राज्य पुढें शिंद्यांनीं घेतलें. ह्याप्रमाणें निरनिराळ्या राजांचीं निरनिराळीं निशाणें आणि खुणेचीं चिन्हें आहेत. युरोपांत जीं जुनीं राजघराणीं आहेत त्यांजजवळही अशा प्रकारचीं निरनिराळीं निशाणें आणि खुणेचीं चिन्हें असलेलीं दिसतात. परंतु ही रीति तिकडे इसवी सनाच्या अकरावे शतकापूर्वी नव्हती. वरील शतकांत ज्या क्रुसेडच्या लढाया (धर्मयुद्धे) झाल्या त्यावेळीं या युरोपिअन राजांनीं अरब लोकांपासून ही निशाणांची आणि चिन्हवैचित्र्याची रीति उचलली. परंतु रजपूत लोकांची वरील रीति ही कांहीं कोणाचें अनुकरण नसून त्यांत उसनेपणाही नाहीं. त्यांची ही रीति तीन हजार वर्षांपासून चालत आली आहे. भारतीयुद्धांतही राजपुरुषांस छत्रचामरादिकांचीं राजचिन्हें असून त्यांच्या निशाणावर (ध्वज) हनुमान् वगैरेंचीं चिन्हें असत असा दाखला मिळतो. याजवरून हिंदुस्थानांत ही राजचिन्हवैचित्र्याची चाल फार प्राचीन आहे असें दिसतें.

रजपूत राजे युद्धास निघाले ह्मणजे त्यांजबरोबर त्यांच्या आराध्य कुलस्वामीचीही मूर्ति चालवीत असत. राव भीम हाडा हा रजपूत राजा जेव्हां लढाईंत पडला तेव्हां तर त्याचा जीव आणि देव हे बरोबरच गेले असें त्याच्या बखरींत लिहिलें आहे! जयसिंग खिची याजबरोबर त्याच्या आराध्य हनुमान्‌देवतेची मूर्ति असून त्यानें शत्रूवर हल्ला करावयाचे वेळीं 'जय बजरंगकी!' असें ह्मणून आपल्या लोकांस युद्धप्रोत्साहन देऊन, चाल करून जावें व त्याने एकदां 'जय बजरंगकी!' ह्मटलें ह्मणजे मग मागें कोणीही शिल्लक न राहतां एकदम सर्व लोक शत्रूवर पडावयाचे असा त्याचा ठराव असे. याच रजपूत राजाची आणखी अशी एक अभिमानाची रीति असे कीं, आपल्या बरोबर असणाऱ्या आराध्य देवतेस शत्रूच्या रक्तानें स्नान घालावयाचें व याप्रमाणें त्यानें कितीएक वेळां आपल्या 'बजरंगबली'ला रक्तस्नानें घातल्याबद्दल लेख आहेत. अस्तु. याचप्रमाणें कोणाची आराध्य देवता बलदेव असून त्यांणीं तीच मूर्ति आपल्यासंगें युद्धसंग्रामांत नेत जावी. अशा अनेकांच्या अनेक देवता असून त्यांजवर त्यांची दृढ भक्ति असे.

शिकंदर बादशाह हिंदुस्थानावर आला तेव्हां त्याजबरोबर लढावयास जे क्षत्रिय गेले त्यांजबरोबरचा थाट शिकंदरास नवीनच होता. त्यांजबरोबर नानाप्रकारचीं निशाणें असून त्यांचा संपत्तिजन्य सुंदर व भव्य देखावा शिकंदरास अपूर्व होता. राजपुतान्यांत जेव्हां प्रथम मुसलमान उतरले तेव्हां त्यांजबरोबर उदेपूरचे राणे व दुसरे शंभर राजे जमून चितोडगडावर लढले. त्यानंतर सिंधुनदीकडे मोठमोठीं युद्धें

झालीं व दिल्ली मुसलमानांचे ताब्यांत जाण्यापूर्वीं क्षत्रियांचीं व मुसलमानांचीं मोठालीं रणें झुंजलीं. हीं जीं युद्धें आणि रणें माजलीं त्यांतील कितीएक गोष्टींचीं वर्णनें चंद बरदाई याचे काव्यांतून सांपडतात. एका युद्धांत विसळदेव व दुसरे ८४ ठाकूर मिळून मुसलमानांवर तुटून पडले व त्यांत ते पूर्ण विजयी झाले. त्या जयाची हकीकत पुराणी दिल्ली येथील पंचरशी स्तंभावर लिहिलेली आहे.

ज्या रजपुतांस जमीन वगैरे स्थावर जिंदगी असेल ते श्रेष्ठ समजले जाऊन त्या मानानें त्यांचा मानही वाढला जातो. मग स्थावर जिंदगीवाल्यांच्या मुली मोठे राजेही करितात. इतका त्यांस मान असतो. रजपुतस्थानांत, सर्व प्रकारच्या दरबारी व गांवच्या कामदार लोकांस जमिनी दिल्या असून त्या वंशपरंपरेनें चालतात. भाट, चितारी, वैद्य, गवंडी, सुतार, वगैरेंसही जमिनी देण्याची तिकडे वहिवाट असून त्या जमिनी परंपरेनें त्यांजकडे राहतात, यामुळें त्या लोकांच्या निर्वाहाची संस्था चांगली असते. रजपुतांच्या मुख्य राजांची गोष्ट बघितली तर, त्यांजकडे खालसा जमिनी असतात; व प्रसंग पडल्यास ते दहा दहा वीस वीस हजार घोडीं मिळवूं शकतात. मोंगल व मराठे यांचा त्यांस उपद्रव असेपर्यंत त्यांना हीं इतकीं घोडीं (फौज) हमेषा मिळविण्याचे प्रसंग येत व त्यामुळें त्यांना युद्धाची संवयच पडून गेली होती. रजपूत राजांचे अमलांतील मुलखाचे जे परगण्यांनीं भाग केले असतात त्यांत प्रत्येकीं बहुतकरून ८४ गांव असतात. ह्मणजे, ८४ गांवांचा तिकडे एक परगणा धरितात. सीमा संभाळण्याकरितां तिकडे एक फौजदार असतो व तोच किरकोळ न्यायमनसुबीचीं कामें करितो. सीमावादाचे संबंधानें बोलणें करण्यास या फौजदारांकडे भोंवतालचे ठाकूर (राजे) येतात. त्यांत जे लहान लहान अधिकाराचे असतात ते जातीनेंच येतात आणि मोठे असतात ते आपल्या वतीनें आपले वकील पाठवितात. ह्या सीमारक्षक फौजदारांचीं ठाणीं किल्ल्यांतून असतात. रजपूत राजांस खालसा

---

१. हल्लीं जी दिल्ली प्रसिद्ध आहे तिला 'शाहजहानाबाद' ह्मणतात. या शहरापासून दहा कोसांवर षरील पुराणी दिल्ली हें शहर आहे मुसलमानांनीं शेवटचा क्षत्रिय राजा पृथ्वीराज यास मारिल्यानंतर त्याच्या वाड्यांत कुतुबमिनार ह्मणून एक जयस्तंभ बांधिला. अद्यापि तो असून त्याचे जवळच हा पंचरशी स्तंभ क्षत्रियांनीं उभा केला आहे. व त्याजवर वर लिहिलेल्या जयाची हकीकत खोदिली आहे. मूळची जुनी दिल्ली ती हीच असून तेथें पृथ्वीराजाचा मोडकळीस आलेला वाडा आहे. त्याचप्रमाणें तेथें बादशाहाच्या कुटुंबांतील बहुतेक मनुष्यांच्या कबरी आहेत. मुसलमानी बादशाह हे हल्लीं प्रसिद्ध असलेल्या दिल्लींत राज्य करीत आणि पुराण्या दिल्लींत राजघराण्यांतल्या पुरुषांची प्रेतक्रिया करीत. पुराण्या दिल्लीचे नजीकच तघलखाबाद, फरूकाबाद, वगैरे उजाड झालेलीं शहरें आहेत. पुराण्या दिल्लींत मानसिंगानें बांधलेली वेधशाळा असून हुमायून बादशाहाची मोठी कबर आहे. हीं सर्व स्थलें पहाण्यासारखीं आहेत.

मुलखाचें उत्पन्न हें मुख्य आहे. परंतु त्याशिवाय त्यांना उत्पन्नाच्या बाबी पुष्कळ असतात. तसेंच, खाणीचें उत्पन्न मोठें असून त्यांत रुपें, तांबे, कथील, संगमरवरी दगड वगैरे मोलवान् जिन्नस निघतात. याचप्रमाणें गनीमपट्टी, घरगिनतीपट्टी, हालपट्टी वगैरे प्रकारच्या अनेक पट्टयांचें उत्पन्न असतें. रजपुतस्थानांतील कांहीं कांहीं जमिनी फार चांगल्या असून त्यांत तीन तीन चार चार पिकें निघतात. ज्यांच्याकडे जमिनी असतात त्यांजवर नजर, सलामीपट्टी वगैरे आणि व्यापारी लोकांच्या मालावर सायरजकात, उदीमपट्टी वगैरे सरकारदेणीं ह्मणून लोकांना राजास द्यावीं लागतात. कोणी मरून त्याचे वारसाकडे जमिनी व इतर उत्पन्नें जावयाचीं, त्यावेळेस त्याजवळून राजेलोक नजर घेतात. रानें, जंगलें, अफीण, दारू, तंबाखू वगैरेंवरील कर व पट्टया यांचें उत्पन्न राजांस असतेंच. अशीं अनेक उत्पन्नें मुख्य राजांस असून त्यांजवर त्यांचे सर्व खर्च चालतात.

राजे लोकांची जी कचेरीची जागा असते तिला 'चबुत्रा' ह्मणतात. तेथें सर्व प्रकारच्या न्यायमनसुबीचे खटले आणि पंचाइती चालतात. बहुतकरून प्रत्येक शहरास 'नगरशेट' ह्मणून अधिकारी नेमलेला असतो व हाच त्या त्या शहरचा मुख्य न्यायाधीश असतो. तो पंच जमवून त्यांचे अभिप्रायानें खटल्यांचे फैसले करितो. चबुत्र्यावर राजचिन्ह ह्मणून नेहेमीं निशाण लागलेलें असतें. हा राजाचा झेंडा असून त्या निशाणाखालीं बसून खोटें बोलूं नये असें सर्व लोक ह्मणतात. लोकांचें सुखदुःख हें सर्व राज्यकर्त्या पुरुषाचे बरेवाईटपणावर अवलंबून आहे. चांगल्या राजपुरुषाचे अमलांत लोक सर्व प्रकारानें सुखी व संतोषी असतात; परंतु तोच आग्रही, मनस्वी व दुष्टबुद्धीचा राजपुरुष असला ह्मणजे प्रजेच्या हालांना आणि विपत्तींना पारावार नसतो. अशा राज्यांचा परिणाम काय व्हावयाचा हें उघडच दिसतें. लोक गांजून व पीडित होऊन त्रासलेले आणि असंतुष्ट असे होतात. व त्यांच्या य अशा स्थितीचा परिणाम त्या राज्याला अचिरस्थायिता व अल्पायुष हें प्राप्त व्हावयाचें. यापेक्षां तो दुसरा कोणता भयंकर परिणाम झाला पाहिजे ?

रजपूत लोकांच्या वीर्यशौर्याची मोठी ख्याति असून जेथें तेथें त्यांच्या पराक्रमाचे डंके वाजले आहेत. राजस्थानाच्या इतिहासांत रजपुतांचें धैर्य, साहस, पराक्रम, क्षात्रधर्मपटुता, अभिमान, महत्वाकांक्षा यांचीं जेथें तेथें वर्णनें येतात. या गुणांचें उत्कृष्ट निदर्शन पुढील गोष्टीवरून होईल:—जहानगीर बादशाहानें चितोडगड घेतला तेव्हां तेथील राणा व सरदारलोक जमून त्यांनीं तो मोंगल लोकांपासून परत घेण्याची मसलत केली. या सरदारांत दोन शाखांचे लोक होते. एक उदयसिंगाचा मुलगा सुकटा व दुसर चोंडा ह्मणून होता. सुकटाच्या वंशास सुकटावत ह्मणतात व चोंडाच्या वंशास

चोंडावत ह्मणतात. वरील दोघे सरदार पुरुष किल्ल्यावर चालून जाण्यास आपआपल्या फौजांनिशीं बाहेर पडले. परंतु तितक्यांत त्यांजमध्यें एक वाद निघाला. जो तो ह्मणे, 'मी बिनीच्या फौजेचा अधिकारी होईन.' शेवटीं राण्यानें अशी तोड काढली कीं, 'चितोडगडाचे पूर्वेस दहा कोशांवर अंताल ह्मणून जो किल्ला मुसलमानांनीं घेतला आहे तो प्रथम जो सरदार हस्तगत करून घेईल त्याजकडे बिनीच्या फौजेचा अधिकार जाईल.' ही गोष्ट दोघांनींही मान्य करून ते आपआपल्या टोळ्या घेऊन निघाले. ते दिवस उजाडला नाहीं तोंच त्या किल्ल्याचे दरवाज्याशीं आले. त्यांत सुकटाचे लोक माहितगार होते. त्यांनीं किल्ल्याचे दरवाजे फोडण्याचा निश्चय केला. परंतु दरवाज्यांस मोठाले सुळे बसविले असल्यामुळें त्यांजवर हत्ती जोर करीतना व त्यांची टक्कर बसेना; ह्याप्रमाणें सुकटावत मंडळी मागें झाल्यावर चोंडावतांची टोळी दरवाजा फोडण्याचा यत्न करूं लागली. तों चोंडा स्वत: हत्तीवरून खालीं उतरला आणि दाराच्या सुळ्यांशीं आपण पाठ लावून उभा राहिला. नंतर त्यानें महातास सांगितलें कीं, 'हत्तींकडून माझ्यावर टक्कर दे.' त्याप्रमाणें महातानें केल्याबरोबर किल्ल्याचे दरवाजे फुटून किल्ल्याचा मार्ग मोकळा झाला व चोंडावत हा दाराच्या सुळ्यांत पची होऊन मेला. इतक्यांत चोंडावतपक्षापैकीं, देवगडचा वेडा ठाकूर ह्मणून होता तो पडला. तेव्हां त्याचें धड चोंडावतांपैकीं एकानें धोतरांत घेऊन पाठीशीं बांधिलें आणि शिडी लावून तो किल्ल्याच्या भिंतीवर चढला व तेथून तें प्रेत किल्ल्यांत टाकून मोठ्यानें ओरडून सांगितलें कीं, 'चोंडावतांनीं किल्ला अगोदर सर केला.' चोंडावत किल्ल्यांत शिरले तेव्हां तेथील मोंगल लोक बुद्धिबळें खेळत बसले होते. त्यांनीं या रजपूत वीरांस सांगितलें कीं, 'येवढा बुद्धिबळांचा डाव आटोपला ह्मणजे लढाई करूं.' त्याप्रमाणें रजपुतांनीं बुद्धिबळांचा डाव होईपर्यंत दम धरिला. परंतु शेवटीं त्यांणीं लढाईंत सर्व मोंगल लोकांस मारून टाकिलें व किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. तेव्हांपासून बिनीच्या फौजेचे अधिकाराचा मान चोंडावतांस मिळाला आहे. ह्याप्रमाणें अनेक युद्धप्रसंगीं रजपूत लोकांनीं धैर्यशौर्याची कांहीं पराकाष्ठा केली आहे व त्यांची कीर्ति आणि लौकिक त्यांच्या इतिहासांतून फार वर्णिला आहे. सारांश, धैर्य, साहस, पराक्रम, क्षात्रधर्मपटुता, अभिमान व महत्वाकांक्षा इत्यादि वर सांगितलेल्या गुणांचें वरील हकीकतींत प्रत्यक्ष निदर्शन झालें असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

दिल्लीच्या दरबारीं रजपूत लोकांस मोठा मान असून त्यांस 'मनसब' वगैरे किताब देत. त्याचप्रमाणें शूर व कर्तबगार रजपुतांस बादशाह राज्याच्या सनदा व पोषाख देऊन आपले मांडलिक राजे करीत. हे रजपूत राजे वर्षांतून दोन चार

वेळ बादशाहाकडे सलामीस जात. पहिल्यापासून बादशाहाचे साह्यकर्ते रजपूत असून त्यांचा दिल्लीच्या बादशाहांनीं मानमरातब आणि परामर्ष चांगला ठेविला होता. हुमायून बादशाहानें रजपुतांस आपलेजवळ चाकरीस ठेविलें होतें. पुढें अकबर बादशाह झाला. त्यानें तर त्यांशीं फारच सलगी ठेवून, ते आपल्या राज्याचे मोठे आधारस्तंभ असेंच त्यांस मानिलें होतें. रजपुतांनीं आपल्याकरितां झटावें असा त्याचा मोटा प्रयत्न होता, व याकरितां तो त्यांस वेळोवेळीं त्यांचे पराक्रम आणि शौर्य बघून उत्तेजनार्थ मोटमोठीं बक्षिसें आणि इनामें देई. रजपुतांचें आणि आपलें साहचर्य व नैकट्य घडावें ह्मणून त्यानें रजपुतांच्या मुली आपल्या लोकांत करण्याची वहिवाट बरीच ज्यास्त प्रचारांत आणिली. तरी, उदेपुरचे रजपूत राजे या कामांत त्यास कधींच अनुकूल झाले नाहींत व त्यांनीं मुसलमानी बादशाहांच्या कृपादृष्टीची कधींच पर्वा केली नाहीं. मुसलमानांना आपल्या मुली देण्याची वहिवाट, प्रथमतः अंभेर(जयपुर)चा राजा भगवानदास यानें आपली मुलगी हुमायून बादशाहास देऊन, पाडिली व तीच वहिवाट पुढील कारकीर्दीत वाढत व कायम होत चालली. हुमायुनानंतर बहुत मुसलमान बादशाहांस रजपूत ठाकुरांनीं आपल्या मुली दिल्या. जहानगीर, खुशरू, शाहजहान, कामबक्ष, औरंगजेब, व त्याचा पुत्र अकबर हे सर्व रजपूत स्त्रियांचेच पुत्र होते. शाहजहान हा जोधबाई ह्मणून रजपूतकन्या होती तिचा मुलगा असून तिची कबर आग्र्याजवळ शिकंदरा या गांवीं आहे. हिंदूंच्या मुली बायका करण्याकडे मुसलमान बादशाहांचा विशेष कल असल्याचें अनेक उदाहरणांवरून दिसतें. दिल्लीचे राज्यास अगदीं पडती कळा लागली असतांही त्या वेळच्या फिरोखशेर बादशाहानें मारवाडचा राजा अजितसिंग याची कन्या आपली बायको केली होती. या लग्नापासूनच उत्तरेकडे इंग्रजांचा पैरव होऊन त्यांचें ठाणें तिकडे पडलें. तो प्रकार असाः— वरील लग्न ठरलें असतां एकाएकीं फिरोखशेर याची प्रकृति बिघडली. तेव्हां सुरतेस असणाऱ्या इंग्रजी व्यापारी कंपनीचा एक डॉक्टर् ह्यामिल्टन् ह्मणून शस्त्रवैद्य होता, त्याला बोलावून नेऊन, त्याच्या औषधानें बादशाहास गुण आला व त्यानंतर त्याचें लग्न झालें. डॉक्टराच्या ह्या कामगिरीबद्दल, 'तुह्माला काय बक्षीस पाहिजे ?' ह्मणून बादशाहानें डॉक्टरास विचारिलें. डॉक्टरानें सांगितलें कीं, 'मला बक्षीस वगैरे कांहीं नको. फक्त आमच्या व्यापारी मंडळीस कलकत्ता येथें हुगळी नदीवर एक वखार घालण्याकरितां थोडीशी जागा द्यावी.' बादशाहानें ही गोष्ट कबूल केली व तेव्हांपासून कलकत्यास इंग्रजांचें ठाणें बसलें. आणि त्याच पायावर पुढें त्या उद्योगी लोकांनीं आपलें अजंतशत्रु असें राज्य स्थापन केलें ! यावरून मनु-

ध्याच्या नीचोन्नतीचा कांहीं नियम नसतो. काळ आला ह्मणजे या सृष्टींत अनेक चमत्कार आणि फेरबदल होतातः राजा असतो तो प्रजास्थानीं होतो व प्रजा असते ती राजस्थानीं होते. त्याचप्रमाणें, रावाचा रंक आणि रंकाचा राव ह्याप्रमाणें संपत्तिजन्य अचिरस्थायिता, आणि राजा हा प्रजा आणि प्रजा ही राजा ही अधिकारजन्य क्षणभंगुरता, इंतिहासांतील अनेक उदाहरणांनीं व्यक्त होत आहे. असु. मुसलमानी बादशाहांस आपल्या मुली दिल्यामुळें जयपूर व जोधपूर येथील राजे आपल्या बहिणींच्या मुलांचे मामा होऊन दिल्लीचें राज्य कायम राहण्यांतच त्यांस हित वाटूं लागलें त्यांत आश्चर्य नाहीं. आणि त्या काळजीनें ते दिल्लीचें बादशाही तख्त संभाळण्याविषयीं दक्ष राहूं लागले.

अकबर बादशाहाचे राज्यांत ४१६ मनसबदार असून एकंदर ५३०००० स्वार होते. प्रत्येक मनसबदाराचे ताब्यांत, ज्याची त्याची ऐपत बघून २०० पासून १०००० पर्यंत स्वार असत. ह्या प्रकारच्या मनसबदाऱ्या रजपुतांकडे ४७ असून त्यांच्या ताब्यांत ५३००० स्वार होते. अंभेर (जयपूर), मारवाड, बिकानीर, बुंदी, जसलमीर, बुंदेलखंड, शेकावत, केरौली, दत्तिया वगैरे सर्व ठिकाणच्या राजांस दिल्लीच्या बादशाहांकडील वर लिहिलेल्या मनसबी होत्या. यांत जयपूरच्या राजाकडेच ५००० स्वारांची मनसब होती. सारांश, दिल्लीचे राज्यास या रजपुतांमुळें मोठी मजबुती असे. आणि या धोरणावरच लक्ष्य देऊन अकबर, जहानगीर व शाहजहान यांनीं हिंदु लोकांचा व धर्माचा मान राखिला होता. हाच क्रम पुढेंही अबाधितपणें चालला असता, तर मुसलमानी बादशाही विलयास न जातां त्यांचें दिल्लीचें तख्त तसेंच कायम राहतें. परंतु तसें होण्याचा ईश्वरी संकेत नव्हता. औरंगजेब बादशाह असा दुष्ट व आग्रही निघाला कीं, त्यानें आपल्या पूर्वजांचे जे हिंदु मित्र व कैवारी होते त्यांस वैरी आणि शत्रु केलें, व ज्यांच्या आधारानें आपल्या पूर्वजांनीं आपली राज्यरूप इमारत सांवरून धरिली होती त्या स्तंभांनांच धक्के देऊन जमीनदोस्त करण्याचा क्रम चालविला ! त्याणें हिंदुधर्माची फार निंदा व उपहास करून हिंदुलोकांना फार छळिलें. यामुळें सर्व हिंदु रयत त्यास त्रासून गेली होती. तरी तो स्वतः मोठा शूर व मसलती असल्यामुळें त्याच्या हयातींत त्याचें राज्य नीट रीतीनें चालून कायम राहिलें. पण पुढें त्याचे मागून फिरोखशेर हा गादीवर आला. तो अगदीं वेडगळ असून त्याजमध्यें राज्यकारभार हांकण्याचा बिलकुल वकूब नव्हता. औरंगजेबापासूनच लोक त्रस्त झाले असून त्यांचे मनांत मुसलमानी राज्याविषयीं अढी बसली होती. व यावेळीं तर राज्यकर्त्यांचीच ढिलाई आणि कमजोर बघून रजपूत लोकांनीं बंडें उभीं केलीं. ह्याप्रमाणें

पूर्वीचा सर्व काळ फिरून गेला. बादशाहास मान देण्याविषयीं लोक नाकें मुरडूं लागले. पूर्वी ज्या रजपूत राजांनीं बादशाही घराण्यांत आपल्या मुली दिल्या त्यांचा दरबारांतून मोठा मानमरातब राहून, जे रजपूत राजे तद्विरुद्ध असून ज्यांनीं आपल्या मुली मुसलमानांचे घरांत घालून आपल्या कुलास कमीपणा आणिला नाहीं त्या सिसोदिया कुळाची, दरबारांत नापत होऊन त्यांस बादशाहांकडून फार हाल आणि अपेष्टा सोसाव्या लागल्या होत्या. परंतु तो काळ सर्व फिरून ह्या वेळीं त्याच सिसोदिया घराण्यास सर्व लोक मान देऊं लागले. इतकेंच नव्हे. तर, मुसलमानी बादशाहावर लोकांची अगदीं अप्रीति होऊन ते सर्वांशीं रजपूत राजांसच विशेष चाहूं लागले. ह्मणजे, ज्या लोकांनीं आपल्या मुली मुसलमानांचे घराण्यांत दिल्या त्या, त्यांजवर आलेल्या प्रसंगावरून दिल्या, ही सबब लावून तीं घराणीं बाटलीं नसून पूर्ववत् शुद्धच आहेत, असेंही पण अभिमानानें लोक बोलूं लागून, राज्यसत्तेचें पारडें हिंदुलोकांकडे झुकलें. सर्व रजपूत राजे लोकांस पूज्य वाटूं लागून, त्यांतही निष्कलंक असे सिसोदिया कुळांतील राजे सर्वांत श्रेष्ठ व वंद्य झाले. ह्यामुळें असें झालें कीं, ज्या रजपूत राजांस कन्यादानानें 'राजाधिराज', 'राजराजेश्वर', 'राजराजेंद्र', इत्यादि मोठमोठे मान व किताब मिळाले होते व जे बादशाही दरबारांत हिऱ्यांसारखे चमकत होते, ते राजे मुसलमानी बादशाही बसत चालली तसे निस्तेज दिसूं लागून, निष्कलंक सिसोदिया घराण्यास आपोआपच तेज चढूं लागलें. ह्याप्रमाणें पूर्वीचा काळ फिरून रजपूत वगैरे हिंदुराजांकडे राज्यवैभवाचा कल फिरला आणि मुसलमानी कारकीर्द संपुष्टांत येत चालली. मुसलमानी राशतींतील सर्व सरदार, मानकरी वगैरे बादशाहीविषयीं उदासीन आणि निरभिमान झाले, आणि जे ते, सांपडेल तसा मुलूख घेऊन, आपआपलें राज्य संभाळून बसले. अशा रीतीनें मोंगलाईचा ऱ्हास होत चालला.

रजपूत राजांचें वर्णन करितां करितां राज्यकारभारसंबंधी जो भाग आला त्याचें वर्णन केलें. आतां पुनः त्यांच्या लौकिकी व गृहसंबंधी रहाटीकडे वळूं. रजपूत राजांचे वाड्यांत शीषमहाल (आरसेमहाल), वाडीमहाल, मंदिरें वगैरे भाग निरनिराळ्या सोईकरितां व ऐषआरामाकरितां केलेले असतात. रजपूत राजांच्या एकीभावाची ही पुढील रीति ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. धाकट्या राजांपैकीं कोणी राजपुरुष मरून त्याचे मागें त्याचा अज्ञान मुलगाच काय तो राज्याचा वारस असला तर मोठाले राजे त्या वारसास पोषाख देऊन त्याचा मोठा मान करितात व मयत राजाचें राज्य त्याचे हातानें चालविण्याविषयीं हरएक प्रकारची मदत करितात. या त्यांच्या थोर व उदार बुद्धीनें धाकटे राजे मोठ्या राजांविषयीं नेहमीं सप्रेम आणि

कृतज्ञ असावे, व हें एक कर्तव्यकर्मच आहे असें ते लोक मानितात. वरिष्ठ राजाची आण ह्मणजे हुकूम मानावा व स्वामीधर्म पाळावा हें रजपूत लोक चांगलें समजतात. तरी जेथें अटीनें तंटे पडतात तेथें मग ते कधींही मागेंपुढें बघत नाहींत. रजपूत राजांचे भाऊबंदांस दरोबस्त थोडीबहुत तरी जमीन असतेच असें पूर्वी एके ठिकाणीं सांगितलें आहेच. सर्वांत थोडी जमीन ज्याचे वांट्यास येते, तो चरसाभर जमिनीचा मालक असें समजतात. चरसाभर जमीन ह्मणजे पंचवीस विघे असून तेवढ्यांत मालकाला एक घोडें व एक मनुष्य इतकें बाळगतां यावें असा बेत असतो. रजपुतींस जमिनीचा लोभ फार असून जिकडून जमीन मिळेल ती गोष्ट ते अगोदर करितात. या जमिनींच्या वांटण्या वगैरे करण्याचे संबंधानें त्यांजमध्यें हमेषा अनेक तंटे व वाद उपस्थित होतात. रजपूत लोकांत लग्नाचें मोठें संकट असून, मुलीचा बाप होऊन जांवयाची मनधरणी करणें ह्मणजे, तें पूर्वजन्मकृत पापाचें फलच आहे असें ते समजतात. व या समजावरून बराच काळपर्यंत त्यांजमधील कित्येक शाखांत अशी रीति पडली होती कीं, मुलगी झाली ह्मणजे, तिच्या लग्नसंबंधी पुढील अपमानावरून तिला बाल्यावस्थेंतच मारून टाकीत. मुलीकरितां जांवयास मान देणें हा ते हलकटपणा समजत. त्यापेक्षां मुली नसलेल्या बऱ्या असें मानून त्यांनीं आजपर्यंत लक्षावधी कन्याहत्या केल्या असतील. या कन्याहत्या करण्याविषयीं जाडेजा कुळांतले रजपूत प्रसिद्ध आहेत. परंतु हा अविचार इंग्रज सरकारांनीं मोठ्या सक्तीनें बंद केला. रजपुतांतील कितीएक शाखांचा असा नियम असे कीं, अमुकच घरीं कन्या दिल्या पाहिजेत. मग त्या घरचा वर अगदीं ह्मातारा असला अथवा त्याला शंभर बायका असल्या तरी चिंता नाहीं. अशा घरीं व असल्या वराला, आपली कन्या देणें, आणि त्यांतही तो वर कांहीं पैशाची अट धरून बसला, ह्मणजे तर कन्येच्या बापाला महत्संकटच वाटून, त्यापेक्षां कन्या बालपणींच मेलेली बरी असें वाटावें हें साहजिक आहे. या प्रकारच्या लग्नाच्या रीति आणि कुळांचे आग्रह पडल्यानें रजपूत स्त्रियांस सुख ह्मणून होतच नाहीं ! असें आहे तथापि त्यांच्या स्त्रिया मोठ्या पतिव्रता आणि पत्येकनिष्ठ असतात. याचीं उदाहरणें, आजपर्यंत ज्या लाखों स्त्रिया आपल्या पतींच्या बरोबर सती गेल्या आहेत व ज्यांनीं आपलें पातिव्रत्य रक्षण करण्याकरितां व शत्रूपासून बचाव आणि अब्रू रक्षण व्हावी ह्मणून अग्निकाष्ठें भक्षण केलीं आहेत, त्यांजवरून समजतील. आपल्या पतीकरितां (जाराकरितां नव्हे) जीव देणाऱ्या त्या साधारण धैर्याच्या आणि यःकश्चित् स्त्रिया असें कोण ह्मणेल तो ह्मणो; आणि अशा स्त्रियांचे उदरीं जे रजपूत बच्चे निर्माण झाले त्यांचें पराक्रमैश्वर्यही असाधारण नसेल हें अनुमानानें देखील समजेल.

मग ज्या अर्थी रजपुतांच्या इतिहासांत त्यांचें धैर्य, शौर्य, स्वामिभक्ति, एकनिष्ठा, सत्यप्रतिज्ञता वगैरे जे बहुमोल गुण ठिकठिकाणीं वर्णिले आहेत, त्यांवरून रजपूत लोकांची जात हलकीसलकी नसून राज्यवैभवाचा मान त्याच क्षात्रधर्मी कुळांस योग्य व यथार्थ होता असें समजेल. रजपूत लोकांनीं आपल्या यजमानांकरितां व स्वतःकरितां प्राण दिले आहेत व जीवाचे बळी पाडिले आहेत. कोणी मोंगलांकरितां, कोणी पठाणांकरितां, कोणी आपल्या ठाकुरांचे रक्षणाकरितां, कोणी आपलें ब्रीद राखण्याकरितां, असे आपपरपणा न ठेवितां व जीवाची पर्वा न करितां समरभूमींत देह ठेवणारे शूर सर्वांशांनीं स्तुत्य व खरे पुरुष होत असें ह्मणावें लागतें. परंतु जेव्हां देशाभिमानाची ह्मणून वार्ताच ऐकूं येत नाहीं तेव्हां आमच्या सती जाणाऱ्या व अग्निकाष्ठें भक्षिणाऱ्या रजपूत स्त्रियाच वंद्य व पूज्य होत असें ह्मणावें लागतें !

रजपूत लोकांची पराक्रमशालिता जशी स्तुत्य असल्याविषयीं वर सांगितलें, त्याचप्रमाणें त्यांच्यामध्यें त्यांस रसातळीं मिळविणारे असे खुनशीपणा, आपसांतील वैरें, द्वेष, सूड उगविण्याची बुद्धि, दीर्घशत्रुत्व इत्यादि आपल्याआपल्यांतच भांडणें, कज्जे, मारामाऱ्या, खून वगैरे करविणारे दुःस्वभावजन्य दुर्गुण फार भरले आहेत. विचारीपणा, दूरदृष्टि, मागचा पुढचा पांच, तारतम्यज्ञान, शांति, गंभीरता, वगैरे उच्च गुणांची त्यांजमध्यें फार दुर्मिळता आहे असें अनेक प्रसंगीं दृष्टोत्पत्तीस येतें व यामुळें ते आपलें व आपल्या कुटुंबांचें जन्माचें नुकसान करून घेतात. अल्पस्वल्प कारणावरून ते हुंबरीतुंबरीवर येऊन एकमेकांचे जीव घेण्यास सज्ज होतात. यःकश्चित् कारणावरून ते आपला अपमान झाला असें समजून त्याजबद्दलचा दीर्घ द्वेष बाळगितात. क्षुल्लक गोष्टीवरून ते एकमेकांचा नाश करण्यास प्रवृत्त होतात. आपला द्वेष व सूड उगवण्याकरितां ते वाटेल तसा प्रयत्न करितात आणि पठाण, अरब, मोंगल, इंग्रज वगैरे जे कोणी भेटतील त्यांची मदत घेऊन व त्यांस आपल्या घरांत घुसवून आपल्या वैरी जातभाईचा समाचार घेतात व समाधान पावतात. कोठें कोठें हीं वैरें आणि हे द्वेष परंपरेनें आणि पिढीदरपिढी सारखे चालत आले आहेत. व तसेच हे द्वेष व हीं वैरें परस्परांचा अपमान आणि सीमावाद यांवरूनच बहुशः असतात असें आढळून आलें आहे.

रजपूत लोकांमध्यें थोरांस 'खमा' ह्मणून नमन करण्याची चाल आहे. त्यांजमध्यें कृतोपकाराची विस्मृति हें मोठें पाप किंवा अधर्म समजतात. नेहमीं सर्वांनीं उपकार करणाराविषयीं कृतज्ञ असावें. कृतघ्नपणा ही अत्यंत नीच व निंद्य अशी अधमता आहे असें ते समजतात. त्यांजमध्यें पाहुण्याचा आदरसत्कार करून त्याची

बरदास्त ठेवण्याची पराकाष्ठा आहे. परक्याशीं वागणूक ठेवण्यांत होईल तितकी सहनशीलता राखण्याविषयीं ते जपत असतात. आपला धर्म आणि आपलें वतन संभाळण्याविषयीं रजपूत फार दक्ष असून त्यांजमध्यें जर कोणाकडून व्यत्यय होईल तर मग त्यांना क्षमा ह्मणून नसते असे ते कडवे होतात. घोडे व हत्यारें बाळगून त्यांची जेथच्या तेंथें व्यवस्था ठेवण्याविषयीं त्यांना मोठी हौस आणि छंद असतो. आणि त्यांच्या योगानेंच ते येवढे शूर बनलेले असतात. दिल्लीच्या बादशाहाचे घरांत जे येवढाले मोठाले मुलूख गेले होते ते सर्व या शूर रजपुतांनींच मिळवून दिले. जोधपूरचा जसवंतसिंग ह्मणून राणा होता, त्यानें काबूलसमरकंदपर्यंतचा मुलूख, व जयपूरचा राजा मानसिंग ह्मणून होता त्यानें बंगाल्याकडे ब्रह्मदेशापर्यंत सर्व मुलूख दिल्लीचे बादशाहाला मिळवून दिला. सारांश, वर जें त्यांच्या इमानीपणाविषयीं आणि स्वामिभक्तीविषयीं सांगितलें त्याप्रमाणें हे, ज्याचें अन्न खातील त्याचे हुकूमबंदे कुत्रे बनून राहतील अशा स्वभावाचे आहेत. व ही स्वामिनिष्ठा 'अर्थं वा साधयेत्, देहं वा पातयेत्' ह्याप्रमाणें ते दाखवितात. सारांश, स्वदेशाभिमान आणि स्वधर्मनिष्ठा हे जे त्यांजमध्यें अद्वितीय गुण पूर्वापर चालत आले होते ते जाऊन निमकहराम आणि निमकहलाल ह्मणजे श्ववृत्तीचा गुण त्यांजमध्यें मुसलमान राजांपासून प्राप्त झाला, तो अद्यापि चालत आहे! रजपूत लोक जेव्हां केशरी रंगाचा पोषाख चढवून समरांगणांत येतात तेव्हां असें समजावयाचें कीं, ते, मारूं किंवा मरूं असा संकल्प करून आले आहेत. ह्मणजे, शत्रूला पाठ दाखवावयाची नाहीं अशी जेव्हां त्यांची प्रतिज्ञा असते, तेव्हां ते केशरी रंगाचा पोषाख करून युद्धाला निघतात. रजपुतांना मराठ्यांनीं फार जर्जर केलें होतें व त्यामुळें तिकडे अनेक दंगे उत्पन्न झाले. पेंढारी, करीम, छडू, अमीरखान इत्यादि दंगेखोर व लुटारू लोकांनीं रजपुतस्थानांत फारच उपद्रव दिला होता, व यामुळें ते लोक फार त्रासले होते. पुढें मराठे व पेंढारी यांचे मागून इंग्रज लोक आले. त्यांनीं सर्व प्रकारच्या व्यवस्था करून दंगेधोपे मोडले; आणि तेव्हांपासून राजस्थानांतील राजेरजवाड्यांस आराम झाला आहे, असे उद्गार ऐकूं येतात.

रजपूत लोकांचे आश्रयानें व साह्यानेंच दिल्लीचें राज्य वाढलें ह्मणून येथपर्यंत अनेक वेळां सांगण्यांत आलें. दिल्लीच्या राज्याचे २२ सुभे होते आणि त्यांत ४१६ मनसबदार होते हें तर वर सांगितलेंच आहे. दिल्लीच्या राज्याच्या हितचिंतक रजपुतांपैकीं जयपूरचे राजे हे अग्रेसर असून त्यांनीं आसाम व अराकान हे प्रांत मिळवून दिले होते. त्याचप्रमाणें जोधपूरवाला राजा जसवंतसिंग यानें काबूल काबीज करून औरंगजेब बादशाहास दिलें होतें. परंतु या जसवंत-

सिंगाचे त्या कृतघ्न औरंगजेबानें जे हाल केले ते फारच अधमपणाचे होते व शेवटीं त्यानें त्यास विषप्रयोगानें ठारही मारिलें. राजा रामसिंग हाडा ह्मणून कोटा येथील ठाकूर होता. त्यानेंही बहुत मुलूख मिळवून दिल्लीच्या बादशाहीस जोडिला होता. राजा रामसिंगाचे नातु ईश्वरीसिंग वगैरे पांच होते. तेही आपल्या आजासारखेच शूर व अभिमानी असून एका लढाईंतच पांचही जण पडले! ते नेहमीं केशरी पोषाख करून रणाला निघत. केशरी पोषाखाचा विशेष वर एके ठिकाणीं लिहिलाच आहे कीं, तसा पोषाख रजपुतांनीं केला ह्मणजे ते मारूं किंवा मरूं आशा प्रतिज्ञेनें निघाले आहेत असें समजावयाचें. ह्या प्रकारचे हजारों वीर दिल्लीच्या बादशाहाचे पदरीं त्याजकरितां मरण्यास तयार असून त्याजपासून मोठमोठे मानमरातब मिळविलेले होते. पण ह्या सर्व गोष्टी जावत्कालपर्यंत सद्दीचा जोर होता, तावत्कालपर्यंत यथास्थित चालल्या होत्या. कारण, पुढें ते सर्व सरदार आणि तो दिल्लीचा बलिष्ठ बादशाह यांस दक्षिणेंतील बाजीराव नामें एका साधारण चित्पावन ब्राह्मणानें आणि महादजी शिंदा नांवाच्या यःकश्चित् पाटलानें चित करून टाकिलें व बादशाहास बैठी नेमणूक देऊन आपण सर्व हिंदुस्थानचे मालक बनले! तेव्हां कालगतीचा फेरा विलक्षण आहे असें जें ह्मणतात तें अनेक उदाहरणांनीं व्यक्त होतें. बरें, ह्या दक्षिणेंतील मराठ्यांनीं जरी येवढी सत्ता काबीज केली, तरी ती त्यांजकडे अव्याहत कोठें राहिली? त्यांच्याकडूनही ती सत्ता निघून तिसऱ्या ठिकाणीं फार दूरच्या इंग्रज लोकांचे हातीं गेली! सारांश, नानाधर्मांचे, नानाजातीचे आणि विविधभाषांचे लोकांस एकत्रस्थलीं नीट रीतीनें वागवून ताब्यांत ठेवणें हें काम मोठ्या मुष्किलीचें आहे. तें कसब इंग्रज लोकांस चांगलें साधलें आहे असें दिसतें. कोणाच्या धर्मांत वगैरे हात घालून बखेडे माजविणें व लोकांस अप्रिय होणें हें त्यांस आवडत नाहीं, व त्या संबंधानें त्यांचा बिलकुल बोभाट नाहीं. परंतु या देशांतील द्रव्यौघ मात्र यांच्यामुळें परदेशांत अप्रतिबद्धपणें चालला आहे अशा कुरकुरी या देशाच्या सर्व भागांतून ऐकूं येतात. तेव्हां, कांहींना कांहीं तरी कुरकुर राहावीच असा हिंदुस्थानच्या लोकांचा दैवयोग आहे असें दिसतें!

रजपूत लोकांचे ठाकुरांजवळ कारभारी किंवा दिवाण असतात. त्यांस निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं नांवें देतात. कोठें त्यांस 'प्रधान' ह्मणतात; कोठें 'भूसाहेब' ह्मणतात; कोठें 'भांजगड,' कोठें 'किल्लेदार', व कोठें 'दिवाण' अशीं अनेक नांवें देण्याची वहिवाट आहे. या कारभाऱ्यांचे हातीं न्यायमनसुबी, वसूलवासलात वगैरे सर्व अधिकार असतो. आणि तशांत ठाकूरसाहेब अजागळ व गैरवाकब असले ह्मणजे तर प्रधानजींचें चांगलेंच पिकतें. हे धूर्त प्रधान आपल्या यजमा-

नास कळसूत्री बाहुलें बनवून आपल्या इच्छेस येईल तसा कारभार हांकतात. त्यांच्या बंदोबस्तानें रयतेची व ठाकूरसाहेबांची गांठ पडणेंही मुष्कील होऊन जातें. त्यांस नानाप्रकारचे छंद लावून वर्ष सहा महिन्यांनीं कधीं, ठाकूरसाहेब अस्तित्वांत आहेत असें समजावें ह्मणून त्यांस दरबारांत आणून रयतेच्या दृष्टीस पाडितात, ह्मणजे झालें. असले ठाकूरसाहेब अज्ञान, मतिमंद, औदुंबरकीटवत् आणि अप्रबुद्ध राहून नानाव्यसनाधीन होतात. अफू खाऊन तिच्या गुंगींतच धुंद असावयाचें, असे प्रकार या ठाकूर लोकांत फार आढळतात. आणि अशी जेथें स्थिति आहे तेथें त्यांस प्रधानही त्याच प्रकारचे मिळून ते हरामखोरी करून आपलीं घरें भरीत असतात, अशीं उदाहरणें तिकडील संस्थानांतून शतशः आढळतात. परंतु ही अदाधुंदी आणि स्वेच्छाचार दिवसेंदिवस इंग्रजसरकारच्या दृष्टीखालीं लुप्तप्राय होत चालला आहेसें दिसतें. तरी, सर्व प्रकारची व्यवस्था आणि सुयंत्रता लौकर होईल असें नाहीं. सरकारानें, राजपुत्र विद्याकला शिकून हुशार व विद्वान् व्हावे ह्मणून त्यांजकरितां विद्यालयें व पाठशाळा स्थापन केल्या आहेत. त्यांत त्यांस विद्येची वगैरे अभिरुचि अंशतः लागते; परंतु राजशिक्षणाचा भाग असावा तसा नसल्यामुळें अशा राजांपासून त्यांच्या संस्थानांस कांहीं फायदा होत नाहीं. याकरितां, ज्याअर्थी सरकारानें त्यांच्या बऱ्याची इच्छा मनांत धरिली आहे त्याअर्थी, त्यांस आपले कारभार कसे करावे याबद्दल कायदेही ठरवून देऊन खालसा मुलखांतील प्रजा ज्याप्रमाणें सुखी, स्वतंत्र विचाराची आणि निश्चित आहे, त्याप्रमाणें संस्थानांतल्या प्रजेलाही त्या गोष्टींचा लाभ मिळेल अशी व्यवस्था करावी, असें पुष्कळांचें ह्मणणें आहे. राजांचे आणि संस्थानिकांचे कारभार सुयंत्रपणें आणि बिनबोभाट चालण्यास वर लिहिल्याप्रमाणें त्यांस कायद्यांचें व नियमांचें बंधारण ठेवून, त्यांचे कारभारी आणि मसलतगार जे नेमणें ते चांगले अनुभविक, दूरदर्शी आणि प्रजाहितेच्छु असे नेमून दिले पाहिजेत. आजपर्यंत जीं जीं राज्यें व संस्थानें खालसा झालीं व ज्यांच्या ज्यांच्याविषयीं बोभाट आणि गवगवे ऐकण्यांत आले त्यांचें त्यांचें बीज वरील दोन प्रकारच्या अव्यवस्थेंतच आहे असें शेवटीं सिद्ध झालें आहे. ह्मणजे, कायद्यानें राजे व संस्थानिक यांचे कारभार बांधिलेले नाहींत आणि त्यांचे कारभारी व मसलतगार योग्य तेच लोक नेमिले जात नाहींत. राज्यांत व संस्थानांत योग्य कामदारांच्या नेमणुकी झाल्या ह्मणजे तोच त्यांच्या सुधारणेचा पाया होय. दिल्लीचे राज्याची पडती झाली तेव्हांपासून दाक्षिणात्यांनीं आपल्या विजयी दुंदुभी वाजविल्या, परंतु त्यांची पुढें काय दशा झाली व त्याचें कारण काय हें जर बघितलें तर वरील मुख्य दोन गोष्टींचा अभाव हेंच समजेल. देशी राज्यांत एखादा मनुष्य शाहणा होतो

व तो असेपर्यंत आपल्या राज्याला वैभवास चढवितो. परंतु त्याचे मागून तिघेजण वेडे बावळे निपजून कमावलेलें वैभव गमावून बसतात; असा अनुभव शेंकडों वर्षांपासून सर्वांस आला आहे. दौलतराव शिंदे, यशवंतराव होळकर, धाकटे बाजीराव, वाजीद अलीशाह, मल्हारराव गायकवाड वगैरेंचीं उदाहरणें सर्वांच्या दृष्टीपुढें ढळढळीत आहेत. त्यांना नियमन किंवा त्यांचे राज्यांत कायदा, कानू, प्रधान, सभा वगैरेंचा गंध नसून स्वेच्छाचार बोकाळला होता. ह्मणून हंमेषा अनुभवी व योग्य मनुष्यांसच कारभारांत घेत जावें हें जें इंग्रजसरकारचें तत्व दिसतें त्याचाच अवलंब देशी राजांकडून आणि संस्थानिकांकडून झाला पाहिजे.

आतां राजे व संस्थानिक यांचीं कुळेंच काय तीं बुळींबावळीं असतात आणि बाकीच्या लोकांत सर्वत्र तरतरी भरलेली असते असें नाहीं. बुळेबावळेपणा हा गरीबश्रीमंतांत सर्व सारखाच आहे. परंतु राजकुलांत जर दुर्दैवानें तसला दुर्गुण दृष्टोत्पत्तीस आला तर त्याचा गवगवा फार होतो. कारण, राजकुलांशीं लोकांचा विशेष निकट संबंध असून लोकांचे हिताहिताचा भाग राजपुरुषांच्या हातांतच असल्यामुळें तसले दुर्गुण त्यांजमध्यें प्रादुर्भूत होणार नाहींत याविषयीं त्यांच्या हितचिंतकांनीं जपलें पाहिजे. श्रीमंत व थोर यांसच कांहीं ईश्वराचा आशीर्वाद अथवा त्यांजवरच ईश्वरी कृपा असून, त्यांच्या घरांत सर्वच बुद्धिवान् आणि कर्तबगार निपजावे असा कांहीं कोठें नियम नाहीं. गरीब श्रीमंत, राव रंक, अधिकारी अनधिकारी, वगैरे सर्वांस एकच गोष्ट लागू आहे. याकरितां सुज्ञ लोकांनीं, दुर्दैवानें अयोग्य गुणांचा राजा प्राप्त झाला तर त्यास योग्यता आणण्याकडे लक्ष्य देऊन आपल्या राज्यांतील प्रजेचा संतोष, शांति आणि भरभराट हीं कायम ठेवण्याकडे विशेष धोरण ठेवावें. तरच ती राज्यरचना. अशी रचना जेथें नाहीं तीं राज्यें लवकरच विलयाला जावयाचीं हा देवाच्याच घरचा ठराव होऊन चुकला आहे! सारांश, राज्यरचना फार उत्तम व निर्दोष असली पाहिजे. याविषयींचें एकच उदाहरण बघितलें ह्मणजे समाधान होईल. हिंदुस्थानांत आजपर्यंत पोट भरण्याकरितां, व्यापाराकरितां, वस्ती करण्याकरितां व येथील श्रीमान् लोकांस बुचाडण्याकरितां यहूदी, पारशी, बलूची, फिरंगी, मोंगल, अरब, पठाण, फ्रेंच, डच, पोर्च्युगीज, वगैरे अनेक जातींचे लोक येऊन गेले. परंतु त्यांच्या घरीं त्यांची राज्यरचना चांगली नसल्यामुळें त्यांजकडून कांहीं एक महत्कार्य घडलें नाहीं. बरें, तीच पुढें इंग्रजी व्यापारी मंडळी आली, तिचा कसकसा उदय आणि भरभराट झाला हें कोणास नव्यानेंच सांगावयाला पाहिजे असें नाहीं. याचें कारण हेंच कीं, त्यांची स्वतःच्या घरची उत्तम व निर्दोष राज्यसरणी. त्या राजांचा या व्यापारी मंडळीस पूर्ण आश्रय आणि

पाठबळ असून ही मंडळीही आपल्या राजाशीं मेळानें आणि एकनिष्ठेनें वागत अस-ल्यामुळें तिनें जीं कृत्यें केलीं तीं तिच्या, तिच्या राज्याच्या आणि एतद्देशीयांच्या फायद्याला आदिकारण झालीं हें सर्वास कबूल आहेच. शिवाय, या व्यापारी मंडळीची निर्लोभता आणि आपल्या राजाशीं ऐक्य हीं इतकीं होतीं कीं, जेव्हां राणीसरकारानें हिंदुस्थानाचा सर्व कमावलेला अधिकार आपलेकडे घेतला, तेव्हां वरील मंडळीचें हिंदुस्थानांत २४ कोट रुपयांचें भांडवल गुंतलें होतें; तें राणीसरकाराकडून मिळतांच तिनें हिंदुस्थानांतील आपली सर्व सत्ता राणीसरकारच्या स्वाधीन केली. अशीं ऐक्यानें व अभिमानानें राजाप्रजेचीं कामें होत असतात. इंग्रजांचे पूर्वी दोनशें वर्षें फिरंगी (पोर्च्युगीज) लोक इकडे येऊन त्यांनीं सर्व कोंकणपट्टी काबीज करून घेतली, व आपले किल्लेकोट बांधिले. ह्या करावयाच्या त्या व्यवस्था त्यांनीं चालविल्या. परंतु त्यांस धर्मसंबंधानें परदेशस्थ लोकांशीं कसें वागावें व त्यांस कसें वागवून घ्यावें हें समजलें नाहीं. हाच प्रकार मुसलमानांच्याही अमदानीचा होऊन, त्या जुलमी लोकांचें निर्दलन करण्यास शिवाजी हा धर्माभिमानी पुरुष उत्पन्न झाला व त्यानें या देशाचें आणि धर्माचें रक्षण केलें.

रजपूत लोक आपल्या ठाकुरांस 'बापजी' ह्मणतात. त्यांशीं इमानानें वागावें आणि आपलें राज्य रक्षावें हा धर्म त्यांजमध्यें चांगला वागत आहे. कधीं कधीं रुसून ते बारवटिये (नाखुष) होतात. परंतु राज्य जाण्याचाच वखत आला तर ते सर्व एकत्र जमून राजाला साह्य करितात. अशा प्रकारचीं उदाहरणें रजपुतांच्या इतिहासांत पुष्कळ आहेत; व या गुणानेंच त्यांनीं, आठशें वर्षें पर्यंत त्यांच्या अगदीं नजीक मुसलमानी अंमल होता तरी त्यांचेपासून आपल्या संस्थानांचा बचाव केला. रजपूत लोकांची प्रत्येक ग्रंथकार शिफारस करितो, इतकेंच नव्हे; तर अकबर, जहानगीर व औरंगजेब हे स्वतः ग्रंथकार असून त्यांनीं लिहिलेल्या बखरींतून यांची फार फार तारीफ केली आहे.

हिंदुस्थानच्या लोकांचा परमुलखाशीं पूर्वीपासून थोडा बहुत संबंध आणि ओळख असल्याविषयीं जुन्या ग्रंथांत माहिती मिळते. उज्जनीचे पंवार राजे यांनीं रूमचा बादशाह ऑगस्टस् याजकडे व्यापारासंबंधानें तह करण्याकरितां वकील पाठविले होते. एरियन् ह्मणून एक यवन (ग्रीक) इ० स० २०० मध्यें भडोच येथें रहात असे व त्यावेळीं ग्रीक लोकांची, इकडील शोधार्थ खेपा घालण्याची वहिवाट असे. टॉलमी नांवाचा एक इजिप्शन् भूगोलशास्त्रज्ञ इ० स० १०० मध्यें हिंदुस्थानांत येऊन त्यानें मुंबई, नासिक वगैरे प्रांत टिपून नेले. त्याचप्रमाणें पुढें अरबलोक येऊं लागून त्यांपैकीं अबू रेहान ऊर्फ अल् बिरुनी व इद्रिसी हे ९०० वर्षां-

मार्गे हिंदुस्थानांतील माहिती मिळविण्यास आले होते. त्यानंतर फ्रेंच लोक व डि-आनविल् वगैरे येऊन सर्व देश फिरून गेले. या सर्व शोधक लोकांचे लेखच पूर्वीच्या इतिहासाचा मेळ बसविण्यास उपयोगी पडतात. सिंध देश हा पूर्वी क्षत्रियांकडे होता. परंतु खलीपा अल् मन्सूर यानें आपला उमर ह्मणून एक सरदार सिंध देशावर पाठवून तो मुलूख काबीज केला, हिंदु राजांकडून चीन, रूम, वगैरे देशांत वकील पाठवीत असल्याचा दाखला सांपडतो, व त्या त्या देशाचे हिंदुस्थानाशीं व्यापार चालले असत. इकडचे नाना जिन्नस तिकडे नेत व तिकडचे अनेक पदार्थ इकडे आणीत, हा व्यापाऱ्यांचा क्रम फार पूर्वीपासून चालू असलेला दिसतो. ह्या प्रकारचा निरुपद्रवी उद्योग चालल्यावर परस्पर देशांमध्यें आणि त्यांतील लोकांमध्यें द्वेषभाव, तिरस्कार, शत्रुत्व आणि अदेखेपणा असण्याचा संभव नाहीं. परंतु पुढें जसे हिंदुस्थानांत मुसलमान शिरून त्यांनीं येथील सत्ता बळकाविली आणि तिच्या पोटांत लोकांवर अनेक प्रकारचे धर्मसंबंधी जुलूम केले, तसे प्रकार झाले ह्मणजे त्यांजविषयीं अप्रिय बुद्धि उत्पन्न होईल यांत नवल नाहीं. आणि अशा गुणांनींच हिंदुलोकांपासून मुसलमानांनीं अप्रीति संपादन केली होती. मुसलमानांच्या दांडगाईचा, जुलमाचा आणि उन्मत्ततेचा अनुभव उत्तरहिंदुस्थानांतील लोकांस फार आहे व त्यांसच तो विचारला पाहिजे. दक्षिणेकडे त्यांजविषयींचा हाकाटा बोभाटा फारसा नाहीं.

फेरिस्त: ह्मणून एक प्रसिद्ध इतिहासलेखक गृहस्थ पूर्वी होऊन गेला. तो मुसलमान होता. त्यानें एक हिंदुस्थानाचा मोठा इतिहास लिहिला आहे. त्यांत तो लिहितो कीं, 'पूर्वी हिंदुलोक मूर्ति पूजित नव्हते; परंतु काश्मीराहून मूर्तिपूजेचा प्रचार हिंदुस्थानांतील ब्राह्मणांत चालू झाला.' आणि त्याच्या लेखांचेच आधारानें बघितलें तर असें दिसतें कीं, काश्मीरांतच तंत्रमार्ग प्रथम उत्पन्न झाला आणि नंतर तो खालीं दक्षिणेकडे प्रसृत होत चालला[1].

विक्रम संवत् चालू झाल्यानंतर ३७५ वर्षांनीं वल्लभीपुरचा शक चालू झाला असें दिसतें. वल्लभीपुरचा शक कित्येक ताम्रपटांवर असलेला पाहण्यांत येतो. वल्लभीपुर इ० स० ३२४ मध्यें लुटलें गेलें, तेव्हां तेथील तीस हजार कुटुंबें तें नगर सोडून मारवाडांत गेलीं. त्यावेळीं तेथें जैनधर्म चालत होता.

---

१. याविषयींची सत्यता पाहणें तर ह्या तंत्रमार्गांतच दिसते. तंत्रांत, १ काश्मीर, २ चीन (ह्मणजे बहुतकरून तिबेटप्रांत असावा), ३ वंग (बंगाल) आणि ४ द्राविड हे चार निरनिराळे पंथ लिहिले आहेत. याविषयीं विशेष माहिती लोकहितवादीकृत 'आगमप्रकाशां'त पहावी.

शिवाजी हा सिसोदिया वंशांतील होता ह्मणून बहुत ठिकाणीं लिहिलें आहे. परंतु रजपूत असून त्याचे वडील दक्षिणचे कुळंब्यांत व्यवहार ठेवूं लागल्यामुळें दक्षिणेकडे त्या वंशास मराठे समजूं लागले असें दिसतें. तरी आपल्या खऱ्या व निष्कलंक क्षात्रतेजाचा त्या वीरशिरोमणीनें प्रकाश पाडून आपली सत्कुलोत्पन्नता सर्व जगास व्यक्त केली. यावरून जातिवंताची गोष्ट कांहीं वेगळीच आहे असें दिसतें.

रजपूत लोकांमध्यें स्त्रियांची मर्यादा फार असून, कोणीं तें मर्यादोल्लंघन केलें तर त्याची त्यांस फार चीड येते. स्त्रियांची अमर्यादा करणाराविषयीं रजपूत लोक मोठे कडवे व अक्षम असतात. त्यांजमध्यें मोठमोठे तंटे बखेडे आणि तड पडण्याला जीं मोठालीं व मुख्य कारणें आहेत, त्यांतील स्त्रीविषयक मर्यादा व रूढी हें एक मुख्य कारण आहे. रजपुतांमध्यें अनुकरणीय अशी एक चाल आहे ती ही कीं, संकटसमयीं भाऊबंदांस सांगून पाठविलें तर त्यांजकडून हरप्रयत्नानें वाटेल तें साह्य मिळतें. त्याविषयीं ते उदासीन नसून आळस करीत नाहींत. ह्याप्रमाणें जो आपल्या भाऊबंदांस साह्य करणार नाहीं त्याची लोकांत छी थू होऊन त्याला बाहेर तोंड काढण्याची देखील लाज वाटते. या प्रतिबंधामुळें रजपुतांमध्यें एकास उपद्रव झाला ह्मणजे लागलेच त्याच्या साह्यार्थ दुसरे त्याचे जातभाई जमून त्याला साह्य करितात. शिवाय त्यांजमध्यें दुसरी अशी चाल आहे कीं, कसाही शत्रु एकदां आपल्या ताब्यांत सांपडला ह्मणजे ते त्याचे हाल करून त्याला विपत्ति देत नाहींत. तर त्याजवर ते कृपा करून, त्याजकडून नम्रतेचें वर्तन राहण्यासारखी खात्री वदवून त्याला सन्मानानें सोडून देतात. परंतु, या कृत्यांत जरी त्यांच्या मनाचा थोरपणा व्यक्त होतो तरी त्यांत भोळेपणाही फार दिसतो. रजपूत लोकांच्या या भोळवट थोरपणाचा लाभ त्यांच्या मुसलमान शत्रूंनीं अनेक समयीं घेतला आहे व शेवटीं विश्वासघातानें रजपुतांस तोंडघशीं पाडून ते त्यांच्या नाशासही कारण झाले आहेत! तेव्हां असला थोरपणा आणि असली उदारता पात्रापात्र विचार केल्याशिवाय जे दाखवितात त्यांचा भोळसरपणाही त्याच मानानें आहे असें ह्मणावें लागतें. रजपूत राजांची अशी चाल आहे कीं, ते वृद्ध व जरठ झाले ह्मणजे आपल्या मुलाचे स्वाधीन राज्यभार करून कोठें तरी पारमार्थिक साधनाकरितां जातात. ह्याप्रमाणें उदेपूरचा राणा तपश्चर्येला राज्यभार सोडून बाहेर जाऊं लागला ह्मणजे तो साळुंबरच्या ठाकुरास पोषाख देऊन राज्याची वहिवाट सांगतो. तसेंच, उदेपूर संस्थानांतून जीं सनदापत्रें होतात त्या प्रत्येकावर या साळुंबरचे ठाकुराची कट्यार ही निशाणी पहिल्यानें होते आणि मग राणा सही करितो, असा साळुंबरच्या ठाकुरास पहिल्यापासून मान आहे. उदेपूरच्या राजास 'राणाजी' आणि साळुंबरच्या रैजास 'रावतजी' असें ह्मणतात.